चानुवाच ॥ कृपालुरकृतद्रोहस्तितिक्षुः सर्वदेहिनाम् ॥ सत्यसारोनवद्यात्मासमः सर्वोपकारकः ॥ २९ ॥ ॥ टीका ॥ कृपेसीं स्वतंत्रज
न्मनाहीं ॥ जेथउपजेतोसाधुपाहीं ॥ कृपावसेसंतांच्यादेहीं ॥ त्याचेंनितेपाहींदाटुगीजगीं ॥ ३० ॥ कृपात्याचेनिमहिमेआली ॥ दया
त्याचेनिजिवेंज्याली ॥ कठिणत्वाचीकांटीकाढिली ॥ समुळींउपटिलीनिष्ठुरता ॥ ३१ ॥ कृपाभूतमात्रांच्याठायीं ॥ सारिखीचसर्वदे-
हीं ॥ येथतेथहेंत्यानाहीं ॥ अवकृपाठायींनिमाली ॥ ३२ ॥ दुःखहरोनिसुखदेत ॥ नवलकृपाळुत्वाचेंचित्त ॥ जीवाचाजाकजीवींसूत ॥
कृपाअद्भुततयापरी ॥ ३३ ॥ जेणेंआपणासीहोयदुःख ॥ तेंपरासीनकरीनिःशेख ॥ जेणेंआपणयाहोयसुख ॥ तेंकरीअवश्यकप्राणि
मात्रां ॥ ३४ ॥ यानावकृपाळुता ॥ हेंपहिलेंलक्षणसंतां ॥ दुसरेंजेंअद्रोहता ॥ ऐकआतांसांगेन ॥ ३५ ॥ लोकींहिंडतांअद्रोहता ॥ ठावोनल
भेचिसर्वथा ॥ मगशरणआलासाधुचित्ता ॥ सावकाशतावस्तीसी ॥ ३६ ॥ तेदयाळुशरणागता ॥ तिहींप्रतिपाळिलीअद्रोहता ॥ भू
तींभगवंतदेखतां ॥ द्रोहाचीवार्तानिमाली ॥ ३७ ॥ व्याघ्रसर्पादिदेहांसी ॥ कदांद्वेषनुपजेत्यांसी ॥ जरीदेऊंआलेउपद्रवासी ॥ तरीद्वे-
षासींकरीना ॥ ३८ ॥ देहासआलीआपदा ॥ तेणेंसांडीकरीमारब्धा ॥ द्वेषयेवोंनेदीकदां ॥ नानळेक्रोधानिजबळें ॥ ३९ ॥ हेंजाणपांअ
द्रोहता ॥ दुसरेंलक्षणतत्वतां ॥ तितीक्षानेंऐकआतां ॥ सहनशीलतासाधूंची ॥ ४० ॥ शांतीपरदेशीझालीहोती ॥ जेथेंजायतेदवडीप
रती ॥ मगयेतांकाकूळती ॥ निजधामासंतींआणिली ॥ ४१ ॥ संतींवाढविलीअतिप्रीती ॥ तेभगवंतासीझालीपढियंती ॥ तेणेंआपु
लीनिजसंपत्ती ॥ शांतीच्याहातींदीधली ॥ ४२ ॥ शांतीसकळवैभवेंसीं ॥ अखंडअसेसंतापाशीं ॥ यालागींसहनशीलतातयांसी ॥
अहर्निशीअनिवार ॥ ४३ ॥ हिंडतांसकळभूतींसैराटा ॥ नह्मणेहाभलावोखटा ॥ नाचतनिजशांतीचेचोहटा ॥ संतगोमटात्यानाव
॥ ४५ ॥ ऐशीजेसहनशीलता ॥ तेतितीक्षाजाणतत्वतां ॥ हेतिसरीलक्षणता ॥ सत्याचीसत्यताअवधारीं ॥ ४५ ॥ सत्यअसत्यासुपाझालेंयेथें
मेरउपजेसेथिच्यानेथें ॥ कोठेंकाहींनदेचिवाढतें ॥ तेणेसंतांतेंराकिलें ॥ ४६ ॥ सत्यासीसंतासींहोताभेटी ॥ तंवसत्यस्वरूपांपडलीगांठी

सत्यसदसत्येंउठी ॥ झालेंसृष्टीचिराय्रु ॥ ४७ ॥ यापरी सत्यसंतदृष्टी ॥ सत्यसारेंआलेंपुष्टी ॥ तंवबळेंचाढलेंसृष्टी ॥ सत्येंभेदीपरब्र-
ह्मीं ॥ ४८ ॥ संतांसीव्हावयाउतराई ॥ सत्यलागलेंत्यांचेपायीं ॥ संतचरणावेगळापाहीं ॥ थारानाहींसत्यासीं ॥ ऐसेसत्यास आधारभू
त ॥ ज्यांचेपारवोवासत्यजात ॥ ज्याचेनिबळेंसत्यसमर्थ ॥ तेशुद्धसंतजाणावे ॥ ८५० ॥ ज्यांसीसबाह्यसत्यलेंतुष्टी ॥ जेसत्यस्वरूपेंआले
पुष्टी ॥ सत्येंधालीदेंढेंकरदृष्टी ॥ ज्यांचीवाचाउठीसत्यत्वें ॥ ५१ ॥ यानावजाणसत्याचेंसार ॥ हिंसंतांचेवसतेंघर ॥ हेमजमान्यसंतसा
चार ॥ मीनिरंतरत्यांपाशीं ॥ ५२ ॥ जीहींअसत्याचीवाऊनिआण ॥ ज्यांमाजीसत्यसप्रमाण ॥ जेसदासत्यत्वेंसंपन्न ॥ हेंमुख्यल-
क्षणसाधूंचें ॥ ५३ ॥ यानावसत्यसार ॥ संतलक्षणसाचार ॥ हाचौथागुणसधर ॥ आनवद्यअपारतेंऐका ॥ ५४ ॥ निंदाआसूयादिदोष
समस्त ॥ निजात्मबोधेंप्रक्षाळित ॥ अत्यंतपवित्रकेलेंचित्त ॥ आनिंदितनिजबोधें ॥ ५५ ॥ गुरुआज्ञातीर्थीन्हाला ॥ न्हाणोनिसर्वांगीं-
निवाला ॥ त्रिविधतापेंसांडवला ॥ पवित्रझालामद्रुपें ॥ ५६ ॥ कायसांगूंत्याचीपवित्रता ॥ तीर्थेंमागतीचरणतीर्था ॥ मीहीपदरजवां
छिता ॥ इतरांचीकथाकायती ॥ ५७ ॥ कृष्णह्मणेउद्धवा ॥ हाआनवद्यगुणपांचवा ॥ ऐकआतांसहावा ॥ समसर्वांसमभावें ॥ ५८ ॥ नि
जरूपेंसर्वसमता ॥ समचिदेखेसर्वभूतां ॥ निःशेषनिमालीविषमता ॥ जेवींसैंधवतासागरीं ॥ ५९ ॥ नानाअलंकारपदार्थां ॥ सोनेपणेंवि
कतघेतां ॥ तेतेपदार्थनमोडितां ॥ स्वभावतासमसोनें ॥ ६० ॥ तैसेनानाकारनानानाम ॥ अवघेंचित्तचिदेखेविषम ॥ साधुचिद्रूपेंसर्व
काम ॥ नदेखेविषमनिजबोधें ॥ ६१ ॥ ऐशियासमसाम्यअवस्थेसीं ॥ दैवेंआलियासुखदुःखासीं ॥ तेहीमुकलीद्वंद्वभावासीं ॥ सहजें-
समरसींनिजसाम्यें ॥ ६२ ॥ सव्यनिनलियामहानदीसीं ॥ अपसव्येंआल्यागांवरसासीं ॥ गंगादोहींतेंहीसमरशी ॥ गुणदोषासीउडवू-
नी ॥ ६३ ॥ तेथपवित्रअपवित्रता ॥ बोलूंचिनयेसर्वथा ॥ गोडकडूपणाचीवार्ता ॥ निजांगेंसमताकरीगंगा ॥ ६४ ॥ तैसेंसुखदुःखाचेंभान
॥ साधूसीसमत्वेंसमान ॥ सदानिजबोधेंसंपन्न ॥ हेंअगाधलक्षणसंतांचें ॥ ६५ ॥ नादियायेकनिगैलला ॥ गायव्याघ्राचेंसांगअवग

ला ॥ भीतरी रवेळ जैं वोळरविला ॥ तैं फिटला भवभ्रमु ॥ ६६ ॥ तैशी भयाभयवार्ता ॥ हैत भावो उठी सर्वथा ॥ साधु उभयसाम्यें पुरता ॥ भयनिर्भमनाती नेणें ॥ ६७ ॥ हें हू साम्य परीपूर्ण ॥ साधूचा हा सहावा गूण ॥ ऐक सातवें लक्षण ॥ परोपकारीपण तयाचें ॥ ६८ ॥ पत्रपुष्पछाया फळ ॥ त्वचा काष्ठ समूळ मूळ ॥ वृक्ष सर्वांगें सफळ ॥ सर्वांसी केवळ उपकारी ॥ ६९ ॥ जो वृक्ष भनि पाळी ॥ कां जो याव घाली मुळीं ॥ दोनी ते वृक्ष पुष्पीं फळीं ॥ समानमेळीं तुष्टला ॥ ७० ॥ मोडूनि फळें आलिया वृक्षें ॥ तो एक हा स्वयें न चारवे ॥ नेवीं कर्मफळा जो न टेंके ॥ तो थ यास करवे परब्रह्म ॥ ७१ ॥ तैसा कायावाचामनें प्राणें ॥ साधु वाढला उपकाराकारणें ॥ आपुलें पार रवें ह्मणों नेणे ॥ उपकारू करणें सर्वांसी ॥ ७२ ॥ हो कां चंद्र उगवो नी अंबरीं ॥ जेंवी जगाचें आधारें निवारी ॥ विश्वाचा तापदूर करी ॥ निववी निजकरीं सर्वांतें ॥ ७३ ॥ तेथ चंद्रामृत चकोरी सेवावें ॥ येरां मी चंद्र न ह्मणे न द्यावें ॥ जो जो भजे जेणें भावें ॥ तो तो पावे नें सरव ॥ ७४ ॥ तैसें चि जाण साधूपाशीं ॥ जो जो श्रद्धा करी जेशी ॥ त्या त्या देनसे सरवासी ॥ होन जगातें उपकारी ॥ ७५ ॥ काउळे चंद्रासी हेळसिती ॥ चकोर चंद्रामृत सेविती ॥ तेवी दुष्ट साधूतें धिःकारिती ॥ भावार्थी पावती निजलाभु ॥ ७६ ॥ सातव्या लक्षणाचा उभारा ॥ सांगीतलें परोपकारा ॥ पुढील श्लोकीं लक्षणें अकरा ॥ साधुनि र्धारा सांगत ॥ ७७ ॥ ॥ श्लोक ॥ कामैरहतधीर्दान्तो मृदुः शुचिरकिंचनः ॥ अनीहो मितभुक् शान्तः स्थिरो मच्छरणो मुनिः ॥ ३० ॥ ॥ टीका ॥ ऊर्वसी आलिया सेजेसी ॥ कामक्षोभ नुपजे ज्यासी ॥ स्वानंदें भोगितां अहर्निशी ॥ विषयकामासी विसरला ॥ ७८ ॥ रंकु पालरवियें बैसला ॥ तो पूर्व वाहना विसरला ॥ तें वि हा निजानंदें तृप्त झाला ॥ काम विसरला तुच्छत्वें ॥ ७९ ॥ काहीं अप्रास पावावया कामावें ॥ साधूसी अप्राप्तता न संभवे ॥ प्राप्त पदीं यथा गौरवें ॥ निजानुभवें विराजतू ॥ ८० ॥ खद्योता सूर्य भेटों जातां ॥ खद्योता न भेटे सविता ॥ सूर्यासी न भेटवे खद्योता ॥ तेवीं अप्राप्तता साधूसीं ॥ ८१ ॥ एवं उभय परी पहातां ॥ कामु निवावला सर्वथा ॥ हे आठवी लक्षणता ॥ अकामता साधूची ॥ ८२ ॥ सावधानें अंतर नेमितां ॥ ते चि बाह्येंद्रियां न्याम कता ॥ जे विकालें की सीं शिकवण देतां ॥ सून सर्वथा चळों कांपे ॥ ८३ ॥ सुरव्य धूर

रणींलागल्याहाता ॥येरकटकजिंतिलेंनझुंजतां ॥कांमूळछेदिलेंअसतां ॥शाखासमस्ताछेदिल्या॥८४॥एवंअंतरवृत्तीचाजोनेम॥
तोंचिबाह्येंद्रियांउपरम॥ऐसेंनिहिजेउपजेकर्म॥तेंनिष्कमअहेतुक॥८५॥अंतरजडलेंआत्मस्थिती॥बाह्यरंगलीमहृत्ती॥तेथेंजोंजोंकर्में
निपजती॥तींतींहोतीब्रह्मरूप॥८६॥बाह्येंद्रियेंकरितांकर्म॥अंतरींचभगटेकर्मब्रह्म॥हाबाह्येंद्रियांचानेम॥आत्मारामजाणती॥८७
॥ऐशीबाह्येंद्रियनामकता॥हेंजाणावीसाधूचीदांतता॥हानववागुणतत्वता॥ऐकआतांदशमातें॥८८॥आकाशसर्वांहिलागे॥
परिकठीणनव्हेकोणीभागें॥तेवींसाधुजाणसर्वांगें॥मृदुलागेसर्वांसी॥८९॥पिंजल्याकापुसाचागोळा॥फोडूंनेणेंकोणाच्याकपाळा॥
॥तैसासाधूचाजिव्हाळा॥अतीकोंवळासर्वांसी॥९०॥पाहेंपांजैसेंगंगाजळ॥गाईव्याघ्रासीकरीशीतळ॥तैसाचिसाधुकेवळ॥मृदु
मंजुळसर्वांसी॥९१॥साधूसीअतिमृदुता॥यानावजाणसर्वथा॥हेंदशमलक्षणयोग्यता॥ऐकआतांअकरावें॥९२॥साधूचीजेशु
चिष्मंतता॥तेभगवद्भजनेंचितत्त्वता॥व्रततपदानादितीर्था॥शुचिष्मंततात्याचेनी॥९३॥परदाराआणिपरधन॥सर्वथानातळेज्यां
चेंमन॥गंगादितीर्थेंत्यांचेंजाण॥चरणस्पर्शनवांछिती॥९४॥स्वदारास्वधनसलोभता॥अवश्यजाणेंअधःपाता॥द्रव्यदारानिरापे
क्षता॥शुचिष्मंततासाधूची॥९५॥ऐशीअसोनिशुचिष्मंतता॥नोनिंदिनाव्रततपादितीर्था॥तेतेविधीनेंआचरितां॥सदाचारतो
अतिश्रोत्री॥९६॥पाहिलियामगरमिठी॥तेनसोडीप्राणसंकटीं॥सांपडेतेंसगळेंचिघोंटी॥तैशीपडलीमिठीजीवब्रह्मां॥आश्रमधर्मा
दिस्वकर्म॥आचरोनीदावीउत्तमोत्तम॥कर्मींब्रह्मप्रतीती॥तेंपुढेंसूनिपरब्रह्म॥९८॥कर्मकरितोंलोकह्मणती॥तोवर्ततहेब्रह्मस्थि
ती॥हेंज्याचेंतोजाणेंनिश्चिती॥लोकप्रतीनाकळेना॥९९॥कुल्लाळभांडेंकरूनिउतरी॥चक्रभोंवेपूर्वीलभंवरी॥तैसासाधूपूर्वसं-
स्कारीं॥स्वधर्मेंकरीवृत्तिशून्य॥१००॥हेंसाधुलक्षणअत्यंतथोर॥ऐकतांस्मरणकरितांदुर्धर॥हेंअकरावेंअतिपवित्र॥ऐकवि
चित्रतेंबारावें॥१॥साधूचीअपरिग्रहता॥परिग्रहोनातळेचित्ता॥देहगेहेंनिःसंगता॥अकिंचनतात्यासीनाव॥१०२॥स्फ

टिकजपाकुसमीं ठेविला ॥ पाहातां दिसे तांबडा झाला ॥ नीळवर्णी भासे निळा ॥ तरी तो वेगळा शुद्ध तें ॥ ३ ॥ स्फटिक जपाकुसमीं
ठेविला ॥ पाहातां दिसे तांबडा झाला ॥ परी तो अलिसपणें संचला ॥ नाहीं मारवला तेणें रंगें ॥ ४ ॥ तैसा साधू परिग्रहामाजी वसे ॥ प
रीग्रही झाला ही दिसे ॥ परी जागृती स्वप्न सुषुप्ती वसे ॥ परी ग्रहो न स्पर्शे निजबोधें ॥ ५ ॥ परीस सर्व धातूंसी रवेंव देतां ॥ मिळणी सोनें क
रीतसला ॥ तो स्वर्णा वांचूनि सर्वथा ॥ आणिका पदार्था नातळे ॥ ६ ॥ तैसा साधू ह्मणे जें जें माझें ॥ तें तें त्यासी नाठवे दुजें ॥ ऐक्यभावा
चेनाचत नभोजें ॥ अधोक्षजें अंकितु ॥ ७ ॥ चिन्मात्रीं जडलें मन ॥ विश्वजहालें चैतन्यघन ॥ बुडालें परिग्रहाचें भान ॥ अकिंचनपण याना
व ॥ ८ ॥ सकळ सांडूनि वना गेला ॥ वनीं वनिताचिंतूं लागला ॥ तो त्यागविबाधक त्वा आला ॥ उलथोन पडिला परिग्रहीं ॥ ९ ॥ उडणी
भिंतीं चढों आले ॥ चढतें कष्टव्यर्थ पाहें ॥ ते पूर्वीं त्या परीसतळीं जाये ॥ उलंडूनि ठायें अतिदुःखी ॥ १० ॥ तेथ सुंगी नव्हे पाहें ॥ उडणी घेऊ
नि वृक्षावरी जाये ॥ सत्संगती मूर्ख उद्धारों लाहे ॥ परी ते उपाय न करिती ॥ ११ ॥ सुंगी लहान उडणी थोर ॥ ते तिचा करूं न शके उद्धार ॥ तैसे
अंकिंचन नर ॥ ते करिती उद्धार सकळांचा ॥ १२ ॥ असो मूर्खाची जे त्यागिती गती ॥ ते अत्यंत बोधें बाधक होती ॥ जंव धरिली नाहीं
संतसंगती ॥ तंव त्याग स्थिती कळेना ॥ १३ ॥ प्रपंच सांडूनि वना गेला ॥ तो देहप्रपंचें दृढ अडकला ॥ देहीं देहो जेणें मिथ्या केला ॥ तो स-
त्य झाला अंकिंचन ॥ १४ ॥ मूर्खासी त्यागतो झाला बाधू ॥ परिग्रही असोनि मुक्त साधू ॥ सबाह्य त्यागें अति शुद्ध ॥ शुक नारद तिहीं-
लोकीं ॥ १५ ॥ ते दो घे हा लागती जन काच्या पायीं ॥ तो राज्य करितां हि विदेही ॥ त्यासी जाणीतसें मी ही ॥ नवल नवाई साधूची ॥
१६ ॥ या नाव मुख्य अकिंचनता ॥ तुज म्यां सांगीतली तत्वता ॥ हे बारावी लक्षणता ॥ ऐक आतां अनीहा ॥ १७ ॥ अनीहा झाला-
बापुडी ॥ जेथ जाय तो दूर दवडी ॥ कोणी राहों नेदी अर्धघडी ॥ अति चरफडी निराश्रयें ॥ १८ ॥ अनिहा हिंडतां लोकीं तिहीं ॥ तिळ-
भरी ठावो न सावया नाहीं ॥ इहा वैरिणी लागली पाहीं ॥ ठायींच्या ठायीं दंडवी ॥ १९ ॥ कोणी येवों नेदी दाराकडे ॥ अति दीन झाले

वापुडे ॥ धायमोकलूनिरडे ॥ गान्हाणेंसंतांपुढेंदेवांआली ॥ २० ॥ तेरूपालूदयामेळे ॥ निजकरेंपुसोनिडोळे ॥ प्रतिपाळिलीस्वहि तकाळें ॥ संतबळेंवाढली ॥ २१ ॥ त्यापूर्वीलवैरस्मरोनियां ॥ इहावैरिणीसाधावया ॥ संतांसीपुसोनीउपाया ॥ तिच्याआयामवर्त ली ॥ २२ ॥ इहेसींनानाचेष्टींचेष्टावितां ॥ अहंआणिममता ॥ कामेंओगींघातलीतत्वतां ॥ कामकांतातेझाली ॥ २३ ॥ इहाकाम बळेंवाढलीथोर ॥ त्यापूर्निराहिलीघरोघर ॥ तीसींसाधावयावैर ॥ अनिहासत्वरचालिली ॥ २४ ॥ अनिहापाठींलागल्याजा ण ॥ अहंममतेसींस्नातारपण ॥ थरथरांकांपोनीप्राण ॥ घायेंवीणसांडवी ॥ ९२५ ॥ असंगशस्त्रमागोंनिसंतां ॥ इहेच्याकराव याघाता ॥ आधींमारूंधांवेअहंममता ॥ दोघेंधाकतांनिमाली ॥ २६ ॥ अनिहादेखोनिदिठी ॥ कामपळेपाराबाटीं ॥ संकल्पाचेशेव टिलेगांठी ॥ उठाउठीसाधिला ॥ २७ ॥ कामपडलारणांगणीं ॥ क्रोधादिशूरपडियेलेरणीं ॥ इहेचाकैवारीतुरेचकोणी ॥ एकेकशो धूनिमारिले ॥ २८ ॥ एवंअनिहेसमोर ॥ राहीऐसानाहींवीर ॥ मारूनिअवघ्यांचाकेलाचूर ॥ क्रियाकरणारकोणीनाहीं ॥ २९ ॥ कामनिमाल्यासर्वथा ॥ इहारांडलीवस्कतां ॥ मूखनदावीचसंतां ॥ अधोगमनतापळाली ॥ ३० ॥ यालागींइहेसवेंजोलागला ॥ तोजाणावाअधोगतीगेला ॥ अनिहेचाजोअंकितझाला ॥ तोआवडलागोविंदा ॥ ३१ ॥ ह्मणसीअनिहानेकोण ॥ कायतियेचें लक्षण ॥ ऐकसांगेनसंपूर्ण ॥ जेणेंबाणेंरवुणाजिव्हारीं ॥ ३२ ॥ कामकर्मादिक्रियाजाळ ॥ तेचिइहाजाणावीअतीचपळ ॥ अंत रींजेस्कनिश्चळ ॥ तेचिकेवळअनिहा ॥ ३३ ॥ अंतरींकामाचीवार्ता ॥ नुपजेकर्माचीकर्मावस्था ॥ अणुभरीनरिघेउद्वेगता ॥ अनिहातत्वतातेजाणा ॥ ३४ ॥ ऐशीअनिहाअसेज्याशीं ॥ देवआज्ञाधारकूत्यापाशीं ॥ तेअनिहासंतांचीदासी ॥ अहर्निशी- जिवेंभावें ॥ ३५ ॥ हे अनिहाअतिगौरवें ॥ साधुलक्षणतेरावें ॥ मीतभोजनतेंचौदावें ॥ लक्षणतेंभवेंअवधारीं ॥ ३६ ॥ नकोंडे रसनेचियाचाडा ॥ नपडेक्षुधेचापांगडा ॥ आवडीनावडीचाउपाडा ॥ करूनिनिधडाभोजनीं ॥ ९३७ ॥ प्राणुआकोसी-

अन्नातें ॥ जठराग्नीभक्षील्यानें ॥ उभयसाक्षीमीयेथें ॥ जाणोनिनिरुतेरससेवी ॥ ३८॥ जेजेंआलेंभोजनासी ॥ दृष्टीनेंत्याचे
दोषहरती ॥ अतिपवित्रकरूनीत्यासी ॥ निजसमरसींसेवितुं ॥ ३९ ॥ नदेखेंभोग्यपदार्था ॥ नाठवेंमीएकभोक्ता ॥ ग्रासींसमर
सीअच्युता ॥ भोगुनीअभोक्तामितभोजी ॥ ४० ॥ अग्नीआर्धाआपण्याऐसेंकरी ॥ मगत्याआहातेंअंगिकारी ॥ साधूआर्धाहें
तातेंनिवारी ॥ मगस्वीकारीअहारातें ॥ ४१ ॥ याचिनावमितभोजन ॥ साधूचेंअहारातेंलक्षण ॥ युक्तीवीणअल्पभोजन ॥ तेंप
थ्यजाणरोग्याचें ॥ ४२ ॥ ग्रासोंग्रासींब्रह्मार्पण ॥ त्यानावपरिमितभोजन ॥ हेंचौदावेंलक्षण ॥ साधुचेंजाणउद्धवा ॥ ४३ ॥ सम
ळजळसंभारी ॥ सरितामेळूमिळेसागरीं ॥ तोंडहुळेनातिळभरी ॥ निर्विकारीनिर्मळू ॥ ४४ ॥ ऐशाआलियानानाउर्मी ॥ जांसी
गजबजनाहींमनोधर्मी ॥ शांतीसंताचापराक्रमी ॥ उपक्रमीनिजशक्ती ॥ ४५ ॥ जेविकांनागवेलीचीवेली ॥ आधारावीण
नवचेवेली ॥ तैसींसंतबळेंशांतीवाढली ॥ मंडपाचढलीचिन्मात्रा ॥ ४६ ॥ झांकळोनीदशदिशांसी ॥ आभाळदाटल्याआ-
काशीं ॥ गगनअविकारीत्यादोषासी ॥ आभाळासींनातळे ॥ ४७ ॥ सीतउष्णापर्ज्यन्यधारा ॥ आंगींनलगतींअंबरा ॥ तेवि
साधूचाउभारा ॥ द्वंद्वसंभारानिर्द्वंद्व ॥ ४८ ॥ तेशांउंचनीचनानाअवस्था ॥ निबिडदाटल्यामोहममता ॥ क्षोभुनुपजेजाचाचित्ता
॥ त्यानावतत्वतानिजशांती ॥ ४९ ॥ संताचेनीशांतीगहन ॥ शांतीचेनीसंतपावन ॥ हेंअन्योन्यनिजलक्षण ॥ पंधरावागुणसंता
चा ॥ ५० ॥ जैसीपणेंनव्हतेंजन्मनास ॥ तेंचपूर्वजांचेंनिजधाम ॥ आतुलीसिरासीजेकेवळ ॥ तेथमनोधर्मस्थिररूजाचा ॥ ५१ ॥ म
जजन्मचीनाहींझालें ॥ मरणम्यानाहींदेखिलें ॥ ऐसेंमनमुळींस्थिरावलें ॥ स्थिरताबोलिलेंयानाव ॥ ५२ ॥ चहूंआश्रमाहुनी
उत्तम ॥ आपुलाजोनिजाश्रम ॥ तेथेंस्थिरावोनीमनोधर्म ॥ वर्णाश्रमचालवी ॥ ५३ ॥ चहूंवर्णामाजीपवित्रता ॥ जेणेंब्राह्मणाची
ब्राह्मण्यता ॥ तेथेंस्थिरावलेंजेणेंचित ॥ जाणस्थिरतातीनाव ॥ ५४ ॥ निहींलोकींस्थीरता ॥ मरोंटेंकलीसर्वथा ॥ कोणीनाहींप्रती

ज्ञा पाळिता ॥ हातींधरितानदेखें ॥ ५५ ॥ दारींराहोंनेदोकोणा ॥ कोणदेईलपथ्यपाणी ॥ अवधींदाकिलींनिराजनीं ॥ तेसज्जनीमति अ
२८ पाळिली ॥ ५६ ॥ स्थिरतावाढलीसंतबळें ॥ जिणोनीवर्णाश्रमादिस्वाळें ॥ भेदोनीआकारादीवर्णपडळें ॥ एकेवेळेवाढली ॥ ११
॥ ५७ ॥ स्वस्वरूपींसायुज्यता ॥ पावोनीस्थिरावलीस्थिरता ॥ तेथवाटमोकळीसंता ॥ स्वभावतात्यांकेली ॥ ५८ ॥ तेथस्वस्वरूपें
स्वकर्म ॥ स्वस्वरूपेंवर्णाश्रम ॥ स्वस्वरूपेंस्वधर्म ॥ स्थीरतासंभ्रमयानाव ॥ ५९ ॥ ऐसीस्वधर्मकर्मअवस्था ॥ तीनावउत्तमस्थीर
ता ॥ हेंसोळावीलक्षणता ॥ मच्छरणतातेंएक ॥ ६० ॥ सरितासागराशरण आली ॥ तेसमरसोनीसिंधूआली ॥ तैशीजेमरणजेट
तीआली ॥ तेपावलीदशामाझी ॥ ६१ ॥ लवणजीवना आलेशरण ॥ तेंतात्काळजालेंजीवन ॥ तैसाअनन्यमजजोशरण ॥ तो-
चिमीजाणहोउनीठाके ॥ ६२ ॥ मजरिघोनियांशरण ॥ जेवांछीतमहिमासन्मान ॥ तोगुळांतीलपाषाण ॥ केवळजाणगुळदगडू
॥ ६३ ॥ जोकांगुळेंमाखिलादगड ॥ तोपाहातांदिसेवरीवरीगोड ॥ शेखींपरिपाकींनिवाडू ॥ अतिजडूकठिणात्वें ॥ ६४ ॥ तैसेंव
रीवरीदावीमाझेंभजन ॥ हृदयींविषय अभिलाषण ॥ तोनव्हेमाझाअनन्यशरण ॥ अतिदूषणलोभाचें ॥ ६५ ॥ सर्वांगींसंकटरस
रेरथ ॥ जिवानाकावरीपांढरीटीक ॥ निरसींनिंदानाराभूलोक ॥ तेसाविषयलोभदेखमद्भजनीं ॥ ६६ ॥ रांडवाकेलेंकाजळकुंकुं ॥
देखोनीजगलागेथुंकूं ॥ तैसाविषयाचाअभिलाखु ॥ जैविवीकिळावीकूअतिनिंद्य ॥ ६७ ॥ त्रैलोक्यसाम्राजवैभवजाण ॥ जोथुं
कोनीथिगालामजशरण ॥ तोसमरसमीचिजाण ॥ मानाभिमानत्याकेसा ॥ ६८ ॥ यानावमतशरण ॥ हेंसतरावेंलक्षण ॥ उद्य
वाजाणसंपूर्ण ॥ मननगूणतोएक ॥ ६९ ॥ श्रुतीगुरुवाक्यनिरूपण ॥ एकतांअद्वैतशरण ॥ युक्तीपरीयालोचन ॥ मननगूणत्यानाव
॥ ७० ॥ आगीकापुराभेटीहोतां ॥ तोअग्नीचहोयवस्तुता ॥ तेंथमाझेस्वरूपींमनठेवितां ॥ मनचिद्रूपतापावलें ॥ ७१ ॥ म २०
नचिद्रूपेंअसेंजाण ॥ तेंचिन्मात्रजालेंकरितांमनन ॥ जेवींजीवनींजन्मलेंजीवन ॥ तेंहोयजीवननिजमिळणीं ॥ ७२ ॥ तैसेंम

नगारेंनिलवलाहें ॥ मनजेथवरीजावोंपाहे ॥ तेथवरीनयामीचआहें ॥ नवचतांराहेंतेथमीची ॥ ७३ ॥ दीपजेउनाजाउंबैसे ॥ तेउताप्र- कावाचातयाअसे ॥ कोठेंहीनवचोनीठायींवसे ॥ तेयेंहिंवसेप्रकाश ॥ ७४ ॥ तेथेंमाझेंकरितांमन ॥ मद्रूपचीजालेंमन ॥ मकरितांगम नागमन ॥ मद्रूपताजाणमोडेना ॥ ७५ ॥ एवंमाझेंस्वरूपजेंकेवळ ॥ तेथेंमद्रूपेंमनविश्चळ ॥ भ्रवाचेपरीअचंचळ ॥ मननशीलत्यानांव ॥ ७६ ॥ मुनियापदाचेंव्याख्यान ॥ मननशीलनाजाण ॥ हेंअठरावेंलक्षण ॥ निरूपणसांगीतलें ॥ ७७ ॥ अत्यंतगोडनिरूपण ॥ पु ढिलेंश्लोकींदशलक्षण ॥ तेंऐकावयाउध्दवसावधान ॥ सर्वांगीकानहोउनीठेला ॥ ७८ ॥ श्लोक ॥ अप्रमत्तोगभीरात्माधृतिमान्जितषड्गुणः ॥ अमानीमानदःकल्पोमैत्रःकारुणिकःकविः ॥ ३१ ॥ टीका ॥ जवदृत्तीशून्यनव्हेमन ॥ तवविश्वासेनाविचक्षण ॥ वृत्तीरूपेंसीत रीलजाण ॥ यालागींसावधाननिजबोधें ॥ ७९ ॥ हांहोदुर्वासाऐसासज्ञान ॥ त्यासीक्षणाक्षणासीतरीमन ॥ नविचारितांगुणागुण ॥ शा पदाख्यदेवाधांवे ॥ ८० ॥ दुर्गंधाजन्मलीमस्त्यानपोटीं ॥ पराशरनाडलातेसाठीं ॥ नारदकौतुकपाहतांदृष्टी ॥ केलागंगातटींनारदी ॥ ८१ ॥ आपु लाकन्यादेखोनिगोमटी ॥ मनक्षोभेंभोगावयाउठी ॥ ब्रह्माधांवेसरस्वतीपाठीं ॥ जोकांसृष्टीपितामहो ॥ ८२ ॥ यामनाऐसेंनाटक ॥ जगा माजीनाहीआणिक ॥ उल्लखोनीनाडिलेतिन्हीलोक ॥ साधूघातकमनाचें ॥ ८३ ॥ ह्मणालमनेवीणभोगघडे ॥ तरीवृत्तीसीक्षोभकांपाचढे ॥ हेंनोलखेंबोलतांतिसज्ञानवेडे ॥ साधूसीनावडेहेंगोष्टी ॥ ८४ ॥ अधिष्ठूनीसत्वगुण ॥ सूक्ष्मरूपेंवृत्तीजाण ॥ तेंक्षोभवउनीयांमन ॥ मीतूं नमह्मणोनीविरेंकरी ॥ ८५ ॥ मुक्ताभिमानींविषयासक्ती ॥ हेचिमनक्षोभाचीप्राप्ती ॥ वृत्तीअसोनियांमुक्ती ॥ साधूनमानितीसर्वथा ॥ ८६ ॥ आतिनाटकीनाटकमन ॥ मुक्ततेंधरीअभिमान ॥ त्याचेंकरावयानिर्दळण ॥ साधूसावधाननिजबोधें ॥ ८७ ॥ मुखींधरित्याकृष्णसर्पासी दीलकरितांलागतकाळप्राप्ती ॥ मरेतवआवरावेंत्यासी ॥ तेविमनासीनिर्दाळिती ॥ ८८ ॥ मननिर्दाळावेंसावधानता ॥ बोलिलेंतेंसाधुसंता ॥ हाएकुणिसावागूणसर्वथा ॥ ऐकआतांविसावा ॥ ८९ ॥ वर्षाकाळींजळबळेसरिता ॥ आल्यासमुद्रनुचंबळेसर्वथा ॥ उष्णकाळींत्यानये

तां॥क्षोभोनीसर्वथाआटेना॥९०॥तैसेंजालियासमृद्धिधन॥साधूचेंउल्हासेनामन॥सकळजाउनीजालानिर्धन॥दीनवदनतोनव्हे॥९१॥दिवसरातीयेतांजातां॥प्रकाशेंपालटेनासविता॥तेंविआल्यागेल्यानानाअवस्था॥गंभीरतांअक्षोभ॥९२॥कडकडीतविजेचेकल्लोळ॥तेणेंगगनासीनव्हेखळबळ॥तैसानानाउर्मीमाजीनिश्चळ॥गांभीर्यंकेवळयानाव॥९३॥हेसंतांचीगंभीरता॥विसावाजीवशिवांसीनत्वता॥हेंविसावासंतांचीअवस्था॥धृतीचीव्यवस्थाअवधारीं॥९४॥मनबुद्धिइंद्रियेंप्राण॥निजधैर्येंधरोनीआपण॥नित्यकेलियाआत्मार्पण॥परतोनीजाणयेवोंनेदी॥९५॥स्वयंवरींजिणोनिआरिरायांसी॥बळेंआणिलेंनोवरीशी॥तोजाउंनेदीआणिकांपाशीं॥तेंविवृत्तीसीनिजधैर्य॥९६॥वागुरेंबांधिल्यामृगासी॥पारधीनजाउंदेवनासी॥तेंवधैर्येंआकळुनीमनासी॥देहापाशींयेउंनेदी॥९७॥देहासीनानाभोगसमृद्धी॥वाउनीयांगजस्कंधीं॥ऐसेंसुखहोतांत्रिशुद्धी॥मनासीदेहबुद्धीधरूंनेदी॥९८॥प्रळयकाळाचाकडकडाटीं॥महाभूहोतांहोयआटाआटी॥तरीमनासीदेहाचीभेटी॥धैर्येंजगजेठीहोंनेदी॥९९॥तैंकाळाचेनीहटतटें॥वृत्तीपरब्रह्मेंसींनीटवाटे॥लाउनीयांआटेंपाटें॥चिन्मात्रपेठेवीकिली॥१०००॥तेथस्वानंदाचाग्राहकु॥तात्काळभेटलानेटकू॥त्यासीजीवेंसहितविवेकू॥घालुनीअंकुसवसरीकेली॥१॥यानावधूतांचेंलक्षण॥हाएकविसावासाधूचागुण॥आतांजिंतिलेजेषड्गुण॥तेंहीलक्षणअवधारीं॥२॥स्वानंदेंतृप्तजाला॥यालागींक्षुधेसीमुकला॥जगाचेजीवनीनिमाला॥तृषाविसरलानिःशेष॥३॥भोगितांनिजात्मसुख॥विसरलाशोकदुःख॥चिन्मात्रज्ञानेंनिष्टंक॥त्यासन्मुखमोहोनये॥४॥तिहींअवस्थांबाहिरा॥वशिन्नलानिजभक्तवोवरा॥तेथेंजराआलीअतिजर्जरा॥कांपतथरथरांपळाली॥५॥मिथ्याजालेंकार्यकारण॥देहाचेनदेखेदेहभान॥तवमरणासीचआलेंमरण॥काळाचेंप्राशनतेणेंकेलें॥६॥यापरीगाहेषड्गुण॥अनायासेंजिंतीन॥सुखेंवर्ततसाधूजन॥हेंलक्षणबाविसावें॥७॥आपुलास्वामीदेखेसर्वांभूतीं॥तेथेंमानइच्छावाकवणामती॥मानाभिमानसोडिलेनिश्चिती॥अतिनम्रवृत्तीवर्तणें॥८॥आधींदेहींधरावाअभिमान॥मगइच्छावाअतिसन्मान॥तव

देहावेंखुंटलेंभान॥मानाभिमानपळाले॥९॥यानावगाअमानीता॥हेंतेंविसावीलक्षणता॥साधूसन्मानाचादाता॥तेंहीकथाअ
वधारीं॥१०॥ब्रह्मादिमशकवरी॥सर्वांतेंवंदीशरीरीं॥एवंनिष्ठाचराचरीं॥दुर्थालुसरीजाणेना॥११॥सर्वभूतींस्वामीदेखे॥लोटांगण
घालीहरिखें॥स्फुरननरहरहेंनोळखे॥अतिसंतोखेंवंदित॥१२॥नानाअलंकारघडिलेगुणें॥सोनेंसोनेंपणेंनव्हेउणें॥तेवीनानारूपांचे
विंदाणें॥पालटुमनेंनेणेंधरुं॥१३॥साकरेचीनिंबोळीकेली॥परीतिकडुपणानाहींआली॥तेंविस्फकरादीयांनीजरीजाली॥तरीनाहींभंग
तीचित्सत्ता॥१४॥सागरींनानापरीचेंथिल्लाळ॥जरीउठिलेअनंतकल्लोळ॥तेंगाकेवळजेंविजळ॥तेंविवस्तुसकळभूतमात्रीं॥१५॥या
परीसकळभूतां॥साधूसन्मानातेंदेता॥हेंचीविसावीलक्षणता॥परबोधकतातेंएक॥१६॥जेंसाभावाजेंशाश्रद्धा॥तैसंतेंशास्फ
रूजायबोधा॥ज्ञानपावोनीनव्हेतमोधा॥स्वरूपीश्रद्धाप्रबोधीं॥१७॥एकज्ञानपावोनीजालापिसा॥पडिलाअव्यवस्तठसा॥नोळ
खेचीसच्छिष्याचीदशा॥योग्यउपदेशातोनव्हे॥१८॥एकज्ञानऐश्वर्येंडंदला॥विस्मयेंनटस्तहोउनीठेला॥काष्टलोष्टाचेपरीपडला॥
नाहींउरलाउपदेश॥१९॥एकज्ञानपावोनीअतिकृपण॥जीवगेलियानबोलेजाण॥भेणेंभेणेंधरोनीमोन॥नबोलेवचनसर्वथा॥
॥२०॥जासीधनकोडीजोडीजाली॥तेंपुरूनीघरीदगडघाली॥दाननंदेतांव्यर्थागेली॥संपत्तीकेलीभूमिसविनी॥२१॥तैसेंकष्टींजोडु
नीज्ञान॥सत्पात्रींनकरीचदान॥हेंज्ञात्याचेंकृपणपण॥वंचकपणस्वभावें॥२२॥येकज्ञानपावोनीसांगोंजाये॥उपदेशींशिष्याबो
धूनव्हे॥तेंज्ञानअबीजजालेंपाहें॥अंकुरोंनलाह्येसत्क्षेत्रीं॥२३॥सधनशिष्यकरावयाजाण॥स्वयेंप्रेमकरीपूर्ण॥आमुचीदीक्षा
अनुभवगहन॥यापरीज्ञानविकाराघाली॥२४॥जेणेंप्रलोभेंचमन॥तैसेंनिरूपीनिरूपण॥अर्थस्वार्थअपदेशपूर्ण॥धनलोभेंज्ञान
निर्वीर्य॥२५॥बिजींरीघालियापाणी॥त्याधान्याचीनव्हेपेरणी॥तेंविधनलोभरिगालियाज्ञानी॥उपदेशोंकोणीस्फुरेंनव्हे॥२६॥शी
घ्यबोधेंवीणझुरेअंतरीं॥गुरूगुरुपणोंगुरगुरी॥तेंबोधकतानव्हेखरी॥घरच्याघरींचुकामुकी॥२७॥शब्दज्ञानेंपरगत॥जोब्रह्म

नदेंसदांडुल्लत॥शिष्यप्रबोधनीसमर्थ॥तोमूर्तिमंतस्वरुपमाझें ॥२८॥हांकांमीजैसाअवतारधारी ॥तैसाचितोहीअवतारधारी॥ नि
द्रत्नाचाअलंकारी॥अलंकारूसच्छिष्यां॥२९॥तोमीयाशद्बकुसरी॥नावाचीअंतरेंबाहेरी॥आंतुवटेनिजनिर्धारी॥एकेघरींनांदत
॥३०॥येकचीबहुतांचेउपदेशी॥ऐकाचंप्रासीस्फटककेशी॥येकेंअज्ञानेंजैशीतैशी॥हाबोलूकोणासीह्मणाल ॥३१॥कृषीवळपेरणी
करी॥भूमीपाडेंपिकतीघुमरी॥अंकुरेनासितीतळींउकरी॥तेबीजतरीअतिशुध्द॥३२॥भूमिचीसरवरानिकर॥बीजपावनगासाचार॥
भाविकींउपजेसविस्तार॥विकल्पींनररूनार॥३३॥जोजैसादेखअर्थ॥तोचिदेखोनीकरीपरमार्थ॥ऐसापरबोधनीसमर्थ॥गुणाविरव्या
तपंचविसावा॥३४॥साधूचीमैत्रीचोखट॥बोळखीसर्वांसीजुनाट॥सर्वांचासरवाश्रेष्ठ॥सर्वांसकटसारिखा॥३५॥सुहृदसर्वांचा
सोयरा॥सर्वांचाजिवलगखरा॥होउनीसर्वांहीबाहिरी॥मित्राचाराचालवी॥३६॥सांगतांआपुलीगुह्यगोष्टी॥अब्ठोंचावयाचेगळ्ळानु
ठी॥आप्तभावेंदेखेस्पष्टी॥आवंचुकोपोटींसर्वांसी॥३७॥क्षीरनीराचंमैत्रीजैशी॥भेदनाहींमिळणीपाशीं॥साधूसर्वजीवसमरशी
॥अभेदभावेंसिमित्रत्वें॥३८॥परममैत्रीचाभोवोदेख॥दुःखहिरोनीद्यावेंसुख॥साधूजीवाचेंनिरसोनीदुःख॥परमसुखदेतसे॥
॥३९॥नवलमैत्रीचेंमहिमान॥सखासर्वांचापुरातन॥सर्वांसीनीचनवेंसौजन्य॥अवंचकपणसर्वदां॥४०॥बंधूहुनीमित्रअधिक॥
पुत्राहुनीमित्रविश्वासिक॥तोमित्रजैजालावंचक॥तेकेवळठकतोजाण॥४१॥मनेधनेंकर्तव्यता॥जाचीअनन्यअवंचकता॥त्या
नावपरममित्रता॥हेखुणतत्वताजाणावी॥४२॥समूळमैत्रीचेंनिरूपण॥विषदसांगीतलेंजाण॥हेंसव्विसावेंसाधूलक्षण॥कारु
ण्यपणतेंऐका॥४३॥प्रत्युपकारनवांछितां॥मीकारुणीकदेहींअहंता॥ऐसेनीदीनदुःखनिवारिता॥कारुण्यसर्वथानाव॥४४
॥नसपूजाधरोनीपोटीं ॥ वैद्यऔषधाचासोडीगांठी॥ कांसभाग्यादेखोनिदिठी ॥ सांगेगोष्टीपुराणिक ॥ ४५ ॥
ऐशीवर्तणूकसर्वथा॥ नेलागलीविषयस्वार्था ॥ साधूचीनव्हेतैशीकथा॥ नैराश्यतादयाळू ॥ ४६ ॥ दया-

णंवेंद्रवलीहष्टी॥ ननुमनधनवेंच्रूनिगांठी॥ अनाथावरीं कृपा मोटी॥ उद्धरी संकटीं दीनातें॥ ४७॥ जेसा कळवळा निजस्वार्था॥ त्याहून अधिक अनाथभूता॥ तियेनांव परम कारुण्यता॥ जाणन लगां उद्धवा॥ ४८॥ हें सत्ताविसावें लक्षण॥ साधूचें जाण संपूर्ण॥ कविपदाचें - व्याख्यान॥ सावधान अवधारीं॥ ४९॥ वेदशास्त्रांचें मथितार्थ॥ झालें करतळामळ समस्त॥ तेंसाचब्रह्मानंदें डुल्लत॥ कविनिश्चितयानांव॥ ५०॥ उपनिषदांचा मथितार्थ॥ ज्याचा मुखाचा वास पाहात॥ परोक्षापरोक्ष ज्याचें निसत्य॥ कविविख्यात त्यानांव॥ ५१॥ कवियापदाचें व्याख्यानें॥ झालीं अठ्ठावीस लक्षणें॥ उरलीं जे अतिगहनें॥ तेंदों श्लोकीं कृष्णो आदरिलें सांगों॥ ५२॥ ॥श्लोक॥ आज्ञायैवंगुणान्दोषान्मयादिष्टानपिस्वकान्॥ धर्मान्संत्यज्य यः सर्वान्मांभजेत स सत्तमः॥ ३२॥ ॥टीका॥ प्रपंचनगरामधीं॥ कर्मनदीचीमहाख्याति॥ तिचें निजजळें जीव वर्तती॥ उत्पत्तिस्थितिआरातिरीं॥ ५३॥ तेनदीचें निर्जीवन मेळें॥ कर्मासियेतें कर्मफळें॥ स्वर्गनरकादिसोहळे॥ तेणें जळबळें भोगिती॥ ५४॥ प्रपंचनगरीं हे निनिघनां॥ वेगें परमार्थासियेतां॥ जोतो कर्मनदी आंतौतां॥ बुडे सर्वथा निर्बुजला॥ ५५॥ एकतरू ऐसें म्हणती॥ तें कर्मांकमंगुर्चा कियारवाती॥ स्वयें बुडोनि आणिकां बुडविती॥ तरलों म्हणती तोंडाळ॥ ५६॥ ऐसे बुडाले नेणों किती॥ बुडतां शिकवणें नेचिंदेती॥ कर्मचि गुपावो नरूणो पायप्राप्ती॥ म्हणोनी बुडविती सर्वांते॥ ५७॥ नकर्मणा हें वेदवचन॥ कर्मेन व्हे ब्रह्मज्ञान॥ तें नमनिती कर्मठजन॥ त्यासि कर्माभिमान कर्मांचा॥ ५८॥ कर्म देहाचें माथ्यापूर्ण॥ तोन सांडितां देहाभिमान॥ कर्माचा त्याग न व्हे जाण॥ कर्मबंधन देहबुद्धी॥ ५९॥ एक अरत्तिरीं असतां नष्ट॥ तरलों म्हणती अकर्मनिष्ट॥ स्वकर्मत्यागी कर्मभ्रष्ट॥ जाण पापिष्ट पाषांडी॥ ६०॥ या कर्मनदीतें न तरला॥ ऐसा नदे सोंदादुला॥ बुडाल्या धुराचि सुदला॥ पाडके तुळा इतरांचा॥ ६१॥ या कर्मनदीचें उत्पन्न॥ मजविपासोनि निश्चितें॥ तेंही सांगेन तुज नतें॥ यथानिगुती निजबोधें॥ ६२॥ आज्ञा येवद्वें मुळीचें मुळ॥ श्लोकीं निंप्रथमपद केवळ॥ येणेंचि कर्मनदी झाली स्थूळ॥ करूनि विवळ सांगत॥ ६३॥ मदाज्ञा मेघगंभिरा॥ नि

श्वसीतपवनहारा॥ चतुर्वेदविधिचाधारा॥ अतिअनिवारावर्षले॥ ६४॥ तेणेंकर्मनदीआतांतें॥ अनिवार खळ्ळथलेंभरतें॥ पूरदाटला जेथि
चातेथें॥ उतारकोणातेंदिसेना॥ ६५॥ तेथगुणदोषाचावळसा॥ विधिनिषेधाचाधारसा॥ कर्माकर्मांचा आवर्तकैसा॥ सबाह्यसरि
साभंवतसे॥ ६६॥ संकल्पविकल्पाचेंमेहुडे॥ नदीदाटलीचहूंकडे॥ नरोंजायेंतोगुंतोनिबुडे॥ पाउलपुढेंनचालवे॥ ६७॥ नत्यवायाचीमग
रभिठी॥ पडल्यासगळेंचिघालीपोटीं॥ उगळोनिनसांडीसंकटीं॥ नेदाउठीअधोगती॥ ६८॥ अंगविकळतेचेमासे॥ तळपताति घ्यावया
आंविसें॥ कर्मठतेचेकर्मठकैसे॥ खटकैतेंसेनिबर॥ ६९॥ काळविक्षेपसर्पासी॥ येकसांपडेविलासआळशी॥ विकळविचारचोंदियेसी
तेणेंवेगेंसीबुडाले॥ ७०॥ एकंतरावयाच्याआशा॥ पडिलेकर्मांचाधारसां॥ नेविधिनिषेधवळसां॥ पडिलेसहसानुगंउनी॥ ७१॥ एक-
स्वकर्मधारीं॥ पडोनिवाहवलेंदुरी॥ नेसत्यलोकमगरीं॥ आपुल्याविवरींसूदले॥ ७२॥ एकानवन्नेपरतटीं॥ माझारींचफळेंगांमटीं॥ दे
खोनिधांविन्नलेअव्हारीं॥ सर्गसंकटींगुंतले॥ ७३॥ आह्मीनरोंयुक्तिबळें॥ ह्मणोनिरिघालेएकेवेळे॥ ते अहंकारखळाळें॥ अध
तमशिकेचूर्णहोती॥ ७४॥ येकींवेदत्रयाचीपेटी॥ दीक्षेचीदोरीबांधलीपोटीं॥ तेस्वर्गांगनाकुचतटीं॥ गुंपोनिशेवटींबुडाले॥ ७५॥ मं
त्रतंत्रादिदीक्षितें॥ गुंतोनिबुडालींजेथिचातेथें॥ कर्मनदीच्यापरपारातें॥ कोण्हीपावतेंदिसेना॥ ७६॥ विरळाकोणीएकसभाग्यये
थें॥ हेसकळउपायहाणोनिलातें॥ जोअतिआवडींभजेमातें॥ कर्मनदीत्यातेंकोरडी॥ ७७॥ माझेभक्तीचेंतारूंनातुडे॥ जंवसप्रेमाचेंशी
डनचढे॥ तंवतरुणोपायबापुडे॥ वृथाकांवेंडेशिणताती॥ ७८॥ धरूनिअनन्यभक्तीचामार्ग॥ करूनिसर्वधर्मकर्मत्याग॥ हातरुणो
पायचांग॥ येरुतोव्यंगअधःपाती॥ ७९॥ अथवाशरीरक्लेशाभेण॥ किंवासर्वथाउबगोन॥ कांधरोनिज्ञानाभिमान॥ स्वकर्मजाणसां
डीना॥ ८०॥ माझीवेदरूपआज्ञाशुद्ध॥ तेवेदविवंचनाविषद॥ स्वधर्मकर्माचेंकर्मवाद॥ अतिअविरुद्धजाणता॥ ८१॥ नेणोंनिस्वध
र्मकर्मातें॥ कांनास्तिक्यमानूनिचित्तें॥ किंवाधरोनियांआळसातें॥ त्यागीकर्मातेंतेंसानव्हे॥ ८२॥ स्वधर्मांचाउत्तमगुण॥ प्र

त्यवार्येंअधःपतन॥यादोंहीनेंजाणोन॥मद्भक्तीसीप्राणविकिला॥८३॥विसरोनिअन्यआठवण॥अखंडनाहरिस्मरण॥त्यानाव
भक्तीसिविकिलाप्राण॥इतरभजनअनुमानिक॥८४॥माझेंनिजभजनप्रेमेंजाण॥विसरलाकर्मांचीआठवण॥कर्मबापुडेंरंकको
ण॥बाधकजाणनव्हेभक्तां॥८५॥सप्रेमकरितांभजनविधी॥सर्वकर्मांतेंविसरलीबुद्धी॥तेजाणावेंभजनसमाधी॥तेथकर्मनि
षुद्धीबाधेना॥८६॥ज्याचीश्रद्धाकर्मांवरी॥तोचिकर्मांचाअधिकारी॥ज्याचीश्रद्धाश्रीधरीं॥तोनव्हेअधिकारीकर्मांचा॥८७
॥जोजीवेंप्राणेंभक्तीसिविकिला॥तोतेव्हांचिकर्मावेगळाजाहला॥त्याच्याभानार्थामीनिकला॥तोकर्मींबांधलाकेविंजाये॥८८
॥गुणदोषाचीजननी॥तेनिःशेषअविद्यानिरसूनी॥जोप्रवर्तलामाझेभजनीं॥तोसाधुमीमानीमस्तकीं॥८९॥निजकल्पनाजेदेहीं
तेचिमुख्यलेंअविद्यापाहीं॥तेंकल्पनानिवालीयाठायीं॥जगंअविद्यानाहींनिश्चित॥९०॥अविद्येच्यात्यागासवें॥धर्माध
र्मादिआघवें॥नत्यजितांचिस्वभावें॥त्यागफावेअनायासें॥९१॥शिरतुटलियापाठीं॥शरीरनिजकर्मासिनुठी॥तेविंअवि
द्यात्यागितांशेवटीं॥त्यजिलेउगउठीसर्वधर्म॥९२॥दिवसाचंद्रउदयोपाहे॥तोझालातेसानाहींहोये॥तेविंअविद्येचेनिविल
यें॥सर्वधर्मलाहेतेदशा॥९३॥खद्योतसूर्योदयापाठीं॥शोधूनिपाहातांनयेदिठी॥तेविंअविद्येचाशेवटीं॥धर्माधर्मकोटीमा
वळती॥९४॥जेविंनक्षत्रमाळा॥खद्योततेजउमाळा॥रात्रीराकस्वोळवणसकळा॥तेविंधर्माधर्मकळाअविद्येसवें॥९५॥
सर्वधर्मत्यागाचीखुण॥उद्धवामुख्यत्वेंहेंचिजाण॥याहीवरीमाझेंभजन॥मुख्यभागवतपणयानाव॥९६॥ह्मणसीअवि
द्याचिकेविनासे॥माधर्माधर्मनाशतीतैसरिसे॥तेअविद्यानाशेंअनायासें॥भक्तिउल्हासेमाझेनी॥९७॥सूर्योदयदेखतांदृष्टी॥
चंद्रनक्षत्राचीमावळेसृष्टी॥तेविंमाझ्याभक्तीउल्हासापाठीं॥अविद्याउठाउठीनिमाली॥९८॥अविद्येचानाशासवें॥नासलीधर्मा
धर्मआघवे॥जेविंगरोदरमारितांजीवें॥गर्भहितीसवेंनिमाला॥९९॥जेव्हांमाझेभक्तीचाउल्हास॥तेव्हांचिअविद्येचानिरास॥

अविद्येसवेंहोयनाशु॥ अनायासेंसर्वधर्म॥११००॥ तेतूंभक्तीह्मणसीकोण॥ जीचेंमागांकेलेंनिरूपण॥ तेमाझीचौथीभक्ति जाण॥
अविद्यानिरसनतिचेनें॥१॥ येरआर्तजिज्ञासअर्थार्थी॥ तेजेंभक्तीतेंआदरिती॥ ते अविद्यायुक्तनिश्चिती॥ चौथीभक्तीमुख्यत्वेंमाझी
॥२॥ जेभक्तिमाजीकहीं॥ अविद्येचाविटाळनाहीं॥ भजनतरीठायींचाठायीं॥ अनायासेंपाहींहोतसे॥३॥ तेमाझीआवडती भक्ती॥
उद्धवाजाणनिश्चिती॥ जीसिअविद्याअसेंथाकती॥ सर्वधर्मकांपतीसर्वदा॥४॥ तेभक्तीचीदेखोनिगुढी॥ अविद्याधाकेंनिमाणसां
डीं॥ सर्वधर्मांचीआवडी॥ घायेंवीणबापुडीनिमाली॥५॥ ह्यामद्भक्तिचापर्यावो॥ आवडिच्यागोडियासांगेदेवो॥ एकभक्ताचाभजन
भावो॥ जेणेंनिर्वाहोभक्तीचा॥६॥ माझेनिअनुसंधानेंविण॥ स्नानसंध्याजपहोमदान॥ तेंअवघेंचिअधर्मजाण॥ मद्भजनतेंनव्हे॥
७॥ गोडीआवडीनेपरपुरुषीं॥ मिथ्यालुडबुडीनिजपतीपासीं॥ तेपतिव्रतानव्हेजेसी॥ जाणभक्तितैशीव्यभिचारी॥८॥ नानावि
षयींठेउनीमन॥ जोकरीध्यानअनुष्ठान॥ तेंजारस्त्रियेच्याऐसेंजाण॥ नव्हेपावनतेभक्ती॥९॥ कायावाचामनसा॥ माझेभक्ति
चापडलाठसा॥ भजतांनाठवेदिवसनिशा॥ भक्तिचीदशायानाव॥१०॥ जपेंवीणनामवदनीं॥ धारणेवीणध्याननमनीं॥ संकल्पेंवीण
मदर्पणी॥ सर्वकर्मपणीसर्वदा॥११॥ निरोधेंवीणवायुरोध॥ मर्यादेवीणस्वरूपबोधू॥ विषयेंवीणसदांस्वानंदु॥ मद्भक्तशुद्धयानाव
॥१२॥ भक्तह्मणवितांगोडवाटे॥ परिभजनमार्गींह्रदयस्फुटे॥ अकृत्रिमभक्तिजेंउमटे॥ तेंमीभेटेंउद्धवा॥१३॥ ऐसेंनिभजनेंजोभज
त॥ तोभजमाजीमीत्याआंत॥ भक्तांमाजीजोउत्तमभक्त॥ साधुनिश्चितयानाव॥१४॥ तोपुरुषामाजीपुरुषोत्तम॥ साधुमाजी
अतिउत्तम॥ तोमाझाअतिविश्राम॥ अकृत्रिमउद्धवा॥१५॥ तयालागींमीआपण॥ करींसर्वांगाचेंआथरुण॥ जीवेंसर्वस्वेंनिं
बलोण॥ प्रतिपदींजाणमींकरीं॥१६॥ तोभजकडेह्मणशीकैसा॥ जंववासिपुढियेंप्राणजेसा॥ सांगतांउत्तमभक्तदशा॥ प्रेमपिसादे
वोझाला॥१७॥ मगनधरतसांवरत॥ उद्धवासिकडियेंघेत॥ फल्लास्वानंदेंनाचत॥ विस्मयेंस्फुंदतउद्धव॥१८॥ मीएकदेवहाएकभ

न॥ हरी विसरला श्रीकृष्णनाथ॥ हा देवो मी येक भक्त॥ तें उद्धवा आंतनुरेची॥ १९॥ ऐसा भक्तिसाम्राज्यपाटीं॥ दोघां पडली ऐक्य गांठी॥ तंव देवो चिकळवळला पोटीं॥ निजभक्तिगोठी सांगावया॥ २०॥ ऐशी उत्तमभक्तांची कथा॥ अतिशयें आवडे कृष्णनाथा॥ रुचकेपणें सर्वथा॥ मागुतां मागुतां सांगत॥ २१॥ श्लोकीं प्रमेय दिसतां अनेगें॥ तें श्रीकृष्णें सांडूनि मागें॥ हा ग्रंथु श्रीरंगें॥ साक्षेपें स्वांगें लिहविला॥ २२॥ हे माझे युक्तीची कथा॥ नव्हे नव्हे जी सर्वथा॥ सत्य मानावें श्रोतां॥ ते अर्थीं चा वक्ता श्रीकृष्ण॥ २३॥ श्रोता व्हावें सावधान॥ मागील कथा अनुसंधान॥ दोघां पडिलें होतें आलिंगन॥ विस्मयपूर्ण उद्धवा॥ २४॥ चढत प्रेमाचें भरितें॥ नेंआवरेनि कृष्णनाथें॥ थापटूनि उद्धवातें॥ सावधत्व आनंकरी हरी॥ ११२५॥ उद्धवातें ह्मणे तत्वता॥ तुज आवडली भक्तिकथा॥ ते चि मी सांगेन आतां॥ सावधानता अवधारीं॥ २६॥ येक जाणोनि भजती मातें॥ एक ते केवळ भावार्थें॥ मी दोहींच्या फललोभा वातें॥ दोघे मातें पढियंते॥ २७॥ ॥श्लोक॥ ज्ञात्वाज्ञात्वाऽथ ये वै मां यावान्यश्चास्मि यादृशः॥ भजंत्यनन्यभावेन ते मे भक्ततमा मताः॥ ३३॥
टीका॥ मी स्वरूपीं सच्चिदानंद॥ जगदादि आनंदकंद॥ नित्य शिद्धू परम विशद॥ माझें स्वरूप शुद्ध जाणता॥ २८॥ देशकाळवर्तमान॥ सर्वीं सर्वदा अनविच्छिन्न॥ सर्वात्मा सच्चिदानंदघन॥ भेदशून्य मी एक॥ २९॥ सत्य ज्ञान अनंत॥ परब्रह्म मी निश्चित॥ ऐसें जाणूनि यां भजत॥ उत्तम भक्त ते जाण॥ ३०॥ शुद्ध झालिया स्वरूपप्राप्ती॥ ह्मण शी भजनके शा रीती॥ देवभक्त ने चि ते होती॥ मी होऊनि भजती मज माजी॥ ३१॥ वाम सव्य दोन्ही भाग॥ दोन्हीं वीं एक चि अंग॥ ते विं देवभक्त विभाग॥ मद्रूपीं सांग भासती॥ ३२॥ पहावां लोखंडा ना आरिसा॥ लोखंडें चि घडे जैसा॥ लोखंडें उजळे कैसा॥ स्वप्रकाश निज तेजें॥ ३३॥ दर्पण उजळलिया पाहीं॥ शशि सूर्य गगन मही॥ बिंब धरी आपुल्या ठायीं॥ अप्रयासें पाहीं स्वलीला॥ ३४॥ तैसें मी होऊनि माझे भक्त॥ अनन्यभावें मज चि भजत॥ तैं माझें ऐश्वर्य समस्त॥ प्रतिबिंबत तया माजी॥ ३५॥ हो कां तरंग जैसा सागरीं॥ त्यासी जळ चि न ळांबरी॥ तैसा माझा भक्त म

मगअन्नपानादिसेविता॥मानीआत्मारामभोक्ता॥सर्वकर्मकर्तृत्वता॥अहंकर्ताहेंह्मणोंनेणें॥५५॥ऐसेंतोजाणिवेनेंनिरामजें॥मा
झेंभजननिपजेवोजें॥तेथ्यांआवडीसेविजे॥जाणतेमाझेंसाजुकें॥५६॥सर्वभावेंसर्वथा॥बाळकाजिजेंजिंमाता॥तेविंमाझियाभो
ळ्याभक्ता॥मीसर्वथासर्वस्वें॥५७॥धांवोनिमिठीघालावयासी॥हितगुजआळांचासी॥खाणेंजेवणेंविश्रांतीरी॥जेविंबाळका
सीनिजजननी॥५८॥तेविंमाझियाभोळ्याभक्ता॥मीनिजांगेंजिवलगमाता॥अर्थस्वार्थपरमार्थता॥जाणतत्वतामीत्यांसी॥५९॥
तोंडिंचेंपोटिंचेंगाठिचें॥मातावाळकालागींवेंचे॥तेविंसर्वस्वकाजलागिंआमुचें॥सर्वस्वभावेंमीवेंची॥६०॥बाळकनमागतांधां
वोनी॥कळकळोनिमातालावीस्तनी॥तेविंभोळ्याभक्ताजागृनी॥मीअनुसंधानेंलाविता॥६१॥ज्येष्ठकनिष्ठपुत्रातेंपिता॥एक
विजाणपनिपाळिता॥ज्येष्ठातेंनिग्रहोकरिता॥लळेंपुरविताबाळकाचे॥६२॥ज्येष्ठनांकुडेंबोलतां॥तोंलावीहाणोंपिता॥बाळ
कबोबडेंबोलतां॥संतोषेंसर्वथासावस्वें॥६३॥सज्ञानारिअनवच्छपडतां॥दोषवाजतीत्यांचेमाथां॥भोळ्याभक्तांनीअपद्दुकल्या॥
तेणेंदंवतत्वनामंनोषे॥६४॥कर्माकर्मभ्रत्यनायका॥हेंसज्ञानामीचसर्वथा॥भोळ्याभक्तांसिकर्मबाधकता॥मीसर्वथायेऊनें
दी॥६५॥भोजनींबैसतांबापासी॥दूरिबैसवीज्येष्ठपुत्रासी॥अंकींवाढवीबाळकासी॥तृप्तिनिजग्रासींदेतसे॥६६॥तेथेंजेजेंगो
डआपणासी॥तेंतेंदेबाळकासी॥नयेतांप्रार्थूनित्यासी॥निजतृप्तीसीकरवित॥६७॥तेविंसाधनींशीणतांसज्ञानासी॥प्रामीहा
यअतिभ्रमासी॥माझियाभोळ्याभक्तांसी॥मीअनायासेंउद्धरीं॥६८॥वाटचुकल्याभुयाळासी॥फरापडेचालोंजाणत्यांसी॥वा
ळकबापाचेकडियेंसी॥श्रमुतयासीयेवोंनशके॥६९॥तेविंसाधनींआंगविकळता॥तेथजेसज्ञानाचेमाथां॥भोळ्याभक्तांतेंमी
उद्धरिता॥भयासर्वथायानाहीं॥७०॥त्यासिवाडनीआपुल्यारवांदीं॥मीणालवंमासुज्यसिद्धी॥नवलत्याचीसांडीवुद्धी॥तेथ
हिभजनविधीनसांडी॥७१॥हृदयींकरवानाथारा॥तोनिभजनासीआदरवारा॥करितांयुक्तिप्रयुक्तीविचारा॥विचारबाधिरा

श्री. ५

मीत्यासी॥ ७३॥ नेणेआचाराविचारा॥ केवळभावार्थभोळाखरा॥ नधरतनरावरत एक [illegible]॥ [illegible]

ळ्याभक्तासी॥ मीनिसामोराधांवेंत्यासी॥ त्यापाशीमी अहर्निशीं॥ [illegible]ळोंपावासीरानेंथा॥ ७४॥ केवळजे भोळेभक्त॥ तेंमगवंता

सीआवडत॥ सांगनांकृष्णामिटियादेत॥ लाळघोंटे नउघडत॥ ७५॥ मजभोळ्याभक्ताची आवडी॥ कायसांगोंत्याचीगोडी॥ त्या

वेगळ अर्धघडी॥ कोंडीपरवडेनावडती॥ ७६॥ यापरिचेजेभोळेभक्त॥ तेमीमानीं उत्तमभागवत॥ त्याचापायांमीलागें भगवंत॥

उत्तमनिश्चितनोजाणा॥ ७७॥ त्यालागींमी आर्तभूत॥ त्यालागीं सदांसावचित्त॥ त्यालागिंमे दशदिशाधांवत॥ भोळाभक्तदुर्ल

भ॥ ७८॥ उद्धवाकायसांगोंगोडी॥ भोळाभक्तदेखोनिदिठी॥ मीहि आपुलीयेसवसाठी॥ [illegible]ठायीनसें॥ ७९॥ येन्हवींभोळकरितां

जाण॥ मजहूनिमाझेभक्तगहन॥ यालागींमीत्यांआधिन॥ भक्तवचननुल्लंघे॥ ८०॥ भोळ्याभक्तांचेंवचन॥ माझेनिनुल्लंघवे

जाण॥ देवकीवसुदेवाचीआण॥ भावेंप्रमाणमजनासी॥ ८१॥ वृथाघृतेंवीणगोंजन॥ वृथावंध्येचेंमैथुन॥ वृथाभावेंवीणभजन

॥ सत्यजाणउद्धवा॥ ८२॥ भावोतेथभाग्यपाहाहो॥ भावोतेथनिःसंदेहो॥ भावोतेथेंप्रगटदेवो॥ निजस्वभावोस्वानंदें॥ ८३॥ भावोते

थविरक्ती॥ भावोतेथप्रगटशांती॥ भावोतेथेंमाझीभक्ती॥ उल्हासतेनिजबोधें॥ ८४॥ एवंभाविकामाझीभक्ती॥ मजरहितस्वानं

देंनाचती॥ यालागिंभोळेजेभावार्थी॥ तेउत्तमहोती भागवत॥ ८५॥ नेणतेभक्तजेमातें भजती॥ तेमजपावलेयारीती॥ सांगीतलीते

म्यांविस्तीं॥ आतांउत्तमभक्तीअवधारी॥ ८६॥ ॥श्लोक॥ मल्लिंगमद्भक्तजनदर्शनस्पर्शनार्चनं॥ परिचर्यास्तुतिःप्रह्वगुण

कर्मानुकीर्तनं॥ ३४॥ ॥टीका॥ नाना अवतारअनुक्रमा॥ शैववैष्णवआंतउत्तमा॥ शास्त्रोक्तमाझ्याप्रतिमा॥ तीर्थक्षेत्रांम

हिमाविशेषज्यांचा॥ ८७॥ ज्याप्रतिमादेवींप्रतिष्ठिलिया॥ ज्यानरकिंन्नरींस्थापिलिया॥ ज्यास्वयंस्वयंभप्रगटलिया॥ शा

स्त्रींबोलिलियागंडकी॥ ८८॥ येकांभक्तअनुग्रहें आल्या॥ भास्करींनिशाचरींज्याकेल्या॥ आपुलाल्याघरींपूजिल्या॥ भक्तीं

करविल्यावेंवर्णिकी ॥ ८९ ॥ ऐशामाझ्याप्रतिमांचीमूर्ति ॥ पाहोंधांवेउल्हासें ॥ पूजानकरावयापोटीं ॥ आवडीमोठीउल्हासें ॥ ९० ॥ मा
झेंस्वरूपतेंमाझेभक्त ॥ मीतेसेंनिमाझेसंत ॥ त्याचेमंदिरालागींआर्तभूत ॥ तेसेंकृपणाचेंचित्तधनालागीं ॥ ९१ ॥ माझ्याप्रतिमांहूनि
अधिक ॥ संतभजनींअत्यंतहरिख ॥ साधुसंगतीचेंअतिसुख ॥ सांडूनिदेखघरदारा ॥ ९२ ॥ चिंतामणीसिकीजेजतन ॥ तेसी-
मर्यादाराखेंसज्जन ॥ नीचनवेंअधिकभजन ॥ नधायमनपूजितां ॥ ९३ ॥ सिद्धकरूनिपूजासंभार ॥ माझेपूजेचाअत्यादर ॥ पूजा
करितांएकाग्र ॥ जेंसाधुनरघरायेती ॥ ९४ ॥ त्यासाधूंचीपूजानकरितां ॥ जोमाझीपूजाकरीसर्वथा ॥ तेणेंमजहाणितल्यालाता ॥
कींतोमाझाघातभवर्तला ॥ ९५ ॥ बालकाचेंकपाळकुळतां ॥ तेणेंमाताहाणितलीलाता ॥ मगपोटाळाहीनेसवितां ॥ क्षोभलीमातास
मजेना ॥ ९६ ॥ तेविंअव्हेरूनिमाझियासंतां ॥ मीविश्वासेंमजपूजितां ॥ तेसेवानघेसर्वथा ॥ अतिक्षोभकतामजकेली ॥ ९७ ॥
संतमाझेलळेवाड ॥ त्यांचीपूजामजलागेगोड ॥ संतसेवकांचेंमीपुरवींकोड ॥ मजनिजनिवाडाचाडसंतांची ॥ ९८ ॥ सांडूनिमाझें
पूजाध्यान ॥ जोसंतांसिघालीलोटांगण ॥ कोटियज्ञांचेंफळजाण ॥ मदर्पणतेणेंकेलें ॥ ९९ ॥ प्रतिमामाझ्याअचेतनव्यक्ती ॥ सं
तसचेतनमाझ्यामूर्ती ॥ दृढभावेंकेल्यात्यांचीभक्ती ॥ तेमजनिश्चितेंपावली ॥ १२०० ॥ सकळतीर्थेंतोचिन्हाला ॥ जपतपा
चेंफळतोचिलाधला ॥ सर्वपूजांचेंसारपावला ॥ जेणेंसाधुवंदिलासन्मानें ॥ १ ॥ प्रतिमानिजकल्पनाउत्तम ॥ संतप्रत्यक्षपुरु
षोत्तम ॥ चालतेंबोलतेंपरब्रह्म ॥ अतिउत्तमसाधुसेवा ॥ २ ॥ माझ्याप्रतिमाआणिसाधुनर ॥ तेथेंयारीतिभजनतत्पर ॥ हातंवसांगित
लानिर्धार ॥ भजनप्रकारतोऐक ॥ ३ ॥ प्रतिमाआणीसाधुसोज्ज्वळें ॥ आवडीनपाहातीज्याचेडोळे ॥ दृष्टीअसोनितेआंधळे ॥
जाणकेवळेंमोरपिच्छें ॥ ४ ॥ जेविंकांप्रियापुत्रधन ॥ देखोनित्यांसिसुखावतीनयन ॥ तेसेंसंतप्रतिमांचेंदर्शन ॥ आवडीजा
णजोकरी ॥ ५ ॥ अतिउल्हासेंजेंदर्शन ॥ यानावगादेखणेंपण ॥ तेणेंसार्थकनयन ॥ दृष्टिचेंभजनयारीती ॥ ६ ॥ देखोनिसं

नमाझीरूपडीं ॥ जोधांवोनियांव्ळवडसवडी ॥ स्नेंवंदरूनियां आवडी ॥ मिठीनगोडीनिरमयें ॥ ७ ॥ ऐसेंसंतांचें आलिंगन ॥ तेणेंसर्वांगहो-
यपावन ॥ कांमूर्तिस्पर्शजाण ॥ शरीरपावनहोनसे ॥ ८ ॥ तीर्थयात्रेनचालतां ॥ संतांसमीपनवचतां ॥ हरिरंगींननाचतां ॥ चरणगर्व
थानिरर्थक ॥ ९ ॥ जोकांनानाविषयस्वार्था ॥ नलाजेनीचापुढेंपळगतां ॥ तोहरिरंगणींनाचतां ॥ आळासर्वथागुरुवण्या ॥ १० ॥ तीर्थ
यात्राक्षेत्रगमनतां ॥ हरिकीर्तनाजागरणाजातां ॥ संतसमागमेंचालतां ॥ कांनृत्यकरितांहरिरंगीं ॥ ११ ॥ यानावगारार्थक-
चरण ॥ इतरसंसारअधोगमन ॥ चरणानेंपावनपण ॥ यानावजाणगुरुत्वा ॥ १२ ॥ सर्वांगानें अर्चन ॥ करवीधरूनिकोटीधन
जेणेंकेलेंमदर्पण ॥ माझें अर्चनयानाव ॥ १३ ॥ धनधान्येंभूनिगांठीं ॥ माझीपूजा आह्वानदृष्टी ॥ तेंनव्हे अर्चनहातवटी ॥ तोजाण-
कपटीमनसींपें ॥ १४ ॥ लोभेंरखावयाआपण ॥ तेंवीअतिमेपुढेंपक्वान्न ॥ अतिनआलियानयाच्लीकण ॥ मदर्चनतेंनव्हे ॥ १५ ॥ करप
विन्नकरितांपूजा ॥ ते आवडती अधोक्षजा ॥ जेनपूजिती गरुडध्वजा ॥ त्याजाणगजाप्रेताच्या ॥ १६ ॥ नकरितांहरिपूजन ॥ नदेतां
सत्पात्रींजाण ॥ जडितमुद्राबाहुभूषण ॥ तेंप्रेतासिलेणेंलेवविलें ॥ १७ ॥ यान्वाचार्थकहरिनेंतेनें ॥ कां अनिवारनामस्मरणें ॥ जय
जयकारानें निगर्जनें ॥ केलेंत्रिभुवनपावन ॥ १८ ॥ रामनामाचागजरीं ॥ सलांगजेंत्यानींनिरवरी ॥ तेंथकळिकाळाचीनुरेडरी ॥
दूरित्वादूरीपळालें ॥ १९ ॥ हरिनामसांडूनिकरंटीं ॥ मिथ्याकरितीतिवाचटी ॥ जेनिंद्यागवणीपटपटी ॥ तेंगागांठीजल्पती ॥ २० ॥
हरिनामाचामुख्यसरयान ॥ त्याचेंमुखींलागलागोड ॥ त्याचेंमनपारगीरार तेंतोंड ॥ मी असेंत्याजवळी ॥ २१ ॥ गद्यपद्येंस्तवन
माळा ॥ नानापदवंदार्चाकळा ॥ छंदकुसरीविचित्रभेदीकळा ॥ स्तुतिगांपाळा अर्पणें ॥ २२ ॥ धैर्यस्थैर्य औदार्य ॥ घनःशामसतिसौं
दर्य ॥ गांभीर्यवीर्यमाधुर्य ॥ गुणगांमेयेंगोविंद ॥ २३ ॥ विचित्रमकुपान्वर्णव्हाहारां ॥ हारनसांकूनिह्लारकरीं ॥ तेणेंहारेंहारकेभीत
री ॥ येऊनिऊहरीकृशानें ॥ २४ ॥ तो अयार्पश्रीहरी ॥ स्वयंशृंगारमुद्रुतीगीं ॥ गांगानिराजमानरगाजिरी ॥ कुरासरनगींवंदिते

॥२५॥ मच्छ झाला तो सागरीं ॥ वराह झाला नासिकद्वारीं ॥ उपजला सावा माझारी ॥ यशोदे घरीं पोषणा ॥ २६ ॥ जठर पाठीं झाला कमठू ॥ बळिछळणीं तो खुजटू ॥ वेदवादें अतिवाजटू ॥ फुरफुराटु निश्वासें ॥ २७ ॥ बाईलच्यो गीं नेल्हा परदेशीं ॥ तीला घेरीं ईपडे वनवासी ॥ एकही गुण नाहीं त्यापासीं ॥ गोरसचोर कृष्ण सगतला ॥ २८ ॥ स्तुती गुण कर्मानुरूप तेन ॥ याना वगायन तूं जाण ॥ श्रद्धा म्हणिजे तें नमन ॥ तें हि व्याख्यान अवधारीं ॥ २९ ॥ माझे भक्ति मानें दर्शन ॥ कां देखतां निसंत जन ॥ जो साष्टांग घाली लोटांगण ॥ देहाभिमान सांडुनी ॥ ३० ॥ साधुजनासि वंदितां ॥ धरणी न वाणी चित्ता ॥ पुनः पुन्हा चरणीं माथा ॥ विनीतता अतिनम्र ॥ ३१ ॥ भागवताचे रजकण ॥ जो मस्तकीं वंदी ना आपण ॥ तो जो वेंजे तां भ्रमेन जाण ॥ अपवित्र पणतें सेंतया ॥ ३२ ॥ सांडूनि लौकिकाच्या लाजा ॥ -जो वैष्णवांच्या रेणुरजा ॥ गडबडां लोळे वोजा ॥ हा भक्तिचा माझा उल्हास ॥ ३३ ॥ या आवडी करितां भजन ॥ सहजें जाति मानाभिमान ॥ हें मुख्य भक्तीचें लक्षण ॥ जे मानाभिमान सांडावे ॥ ३४ ॥ त्यजूनियां मानाभिमान ॥ करावें मत्कीर्तन श्रवण ॥ श्रवणादि भक्तीचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण उद्धवा ॥ ३५ ॥ ॥ श्लोक ॥ मत्कथाश्रवणे श्रद्धा मदनुध्यानमुद्धव ॥ सर्वलाभोपहरणं दास्येनात्मनिवेदनं ॥ ३५ ॥ ॥ टीका ॥ दृढ आस्तिक्य समाधान ॥ श्रद्धा श्रद्धा त्यानाव जाण ॥ भावार्थेन डंडळे मन ॥ कथाश्रवण सादरें ॥ ३६ ॥ वक्त्याच्या वचनापासीं ॥ जडूनि घाली कानामनासीं ॥ श्रवणार्थ वाढवी बुद्धीसी ॥ विकळाकथेसी भावार्थें ॥ ३७ ॥ जेवि दुधाला गीं माजर ॥ संधी पाहा त्यासादर ॥ नेणिं सेवा वयाकथासार ॥ निरंतर उल्हास ॥ ३८ ॥ जडित कुंडलें मंडीत कान ॥ तें श्रवणासि नाहें मंडण ॥ श्रवणासि श्रवण भूषण ॥ श्रवणें श्रवण सार्थक ॥ ३९ ॥ जरी स्वयें झाला व्याख्याता ॥ पुराण पठणें पुरना ॥ तरि न साधुमुखें हरिकथा ॥ एकें सादरता अतिप्रीती ॥ ४० ॥ श्रवणें श्रवणार्थीं सावधान ॥ तो चि अर्थ करी मनन ॥ संपन्न्या कथा व्याख्यान ॥ मनीं मनन संपन्न ॥ ४१ ॥ ऐसें ठसावल्या मनन ॥ सहजें चि लागे माझें ध्यान ॥ सगुण अथवा निर्गु

ण॥आवडीप्रमाणध्यानासी॥ ४२॥ तेथध्येयध्यानध्याता॥तिन्हींसियेकिंगांठीनसतां॥तंवचिवरीध्यानावस्था॥ जाणतत्व
तांउद्धवा॥ ४३॥ ज्याच्याजेविंध्यानाचीआवडी॥ज्याच्यामनासिमाझीगोडी॥उद्धवाहेंतेंचिजांदेजोडी॥जेंजन्मकोडीनिजभा
ग्य॥४४॥निःकामकरांनियांमन॥जन्मजन्मांतरींसाधन॥केलेंअसेलतैंमाझें ध्यान॥विश्वासेंजाणदृढलागी॥४५॥दृढ
लागल्यामाझेंध्यान॥ अनन्यभावेंमाझेंभजन॥सर्वपदार्थंसिजाण॥आत्मसमर्पणमजकरी॥४६॥वेदिकलौकिकदेहिक॥
यान्हियांचेलाभदेख॥जरीझाल्याअलौलिक॥भक्तत्यानिकतेंनघे॥४७॥वेदिकलाभदिव्यसामग्री॥ स्वर्गादिराज्यलोकव
री॥भक्ततेंहिहातींनधरी॥भजनसरसेंकरीसफटंक॥४८॥लौकिकलाभाचीश्रेणी॥कल्पतरूकामधेनूचिंतामणी॥भक्त
अर्पीकृष्णार्पणीं॥हरिभजनीं संतुष्ट॥४९॥देहिकलाभाचीथोरी॥ गजांतलक्ष्मीआल्याघरीं॥भक्तकृष्णार्पणकरी॥भज
नसरसेंसंतुष्ट॥५०॥विरिंच्यादिलाभजाण॥सर्वमानीनियांगौण॥माझेभक्तसिविकिलाप्राण॥सर्वमदर्पणमजकरी॥५१
॥जेणेंसेवेसिविकिलाप्राण॥व्यर्थजावोंनेदीअर्धक्षण॥ माझीकथामाझेंध्यान॥महोत्साहोजाणमाझाचि॥५२॥ ॥
श्लोक॥मज्जन्मकर्मकथनंममपर्वानुमोदनं॥गीततांडववादित्रगोष्ठीभिर्मद्गृहोत्सवः॥३६॥ ॥टीका॥ध्यानावस्थेकरी
ध्यान॥नातरिंकथानिरूपण॥अनुसंधानीसावधान॥रितेंमनराहूंनेदी॥५३॥माझीजन्मकर्मेनिरूपितां॥आवडीउल्हा
सयोरचित्ता॥स्वेदरोमांचद्रवतां॥सप्रेमकथाउल्हासें॥५४॥ऐकूनिरहस्यहरिकथा॥द्रवनुपजेज्याचियाचित्ता॥तोपा
षाणजाणसर्वथा॥जव्हांअसतांकोरडा॥५५॥ऐकमाझेभक्तिचेंचिन्ह॥माझ्यापर्वांचेंअनुमोदन॥करीकरवीआपण॥दे
नोद्धरणउपावो॥५६॥पर्वविशेषभागवतधर्मी॥नृसिंहजयंतीरामनवमी॥वामनजयंतीजन्माष्टमी॥उत्तमोत्तमीशिव
रात्र॥५७॥वैष्णवांशिशिवराचीविरुद्ध॥हेंबोलणें अतिअबद्ध॥सकळपुराणींअविरुद्ध॥व्यासविशुद्धबोलिला॥५८॥

शिवश्यामतमोगुणी ॥ तोशुद्ध झाला विष्णुच्याध्यानीं ॥ विष्णुश्याम शिवाचिंतनीं ॥ विनटले गुणीं येरयेरा ॥ ५९ ॥ शिव धवळ धा
मगोक्षीर ॥ विष्णु घनश्याम अतिसुंदर ॥ बापध्यानाचा बडिवार ॥ येरयेरध्यापिला ॥ ६० ॥ मुदली दोन्हीं सिऐक्य शुद्ध ॥ माउपास
कांसि कां विरुद्ध ॥ शिवरात्री वैष्णवांसि अनिरुद्ध ॥ व्रतविशुद्ध सर्वांसी ॥ ६१ ॥ जें सर्वप्रिय व्रतराणी ॥ जे सकळ कल्याणाची
श्रेणी ॥ उभय पक्षां तारिणी ॥ वैष्णवजननी एकादशी ॥ ६२ ॥ जे शुक्लकृष्ण पक्षविधी ॥ भक्तवारु नयां रवांदीं ॥ नेऊनियां सायुज्य
सिद्धी ॥ मोक्षपदीं बैसवी ॥ ६३ ॥ करावी शुक्ल एकादशी ॥ त्यजावी कृष्णपक्षासी ॥ रुपडलिया एका पाखासी ॥ सायुज्या
सी केविं पावे ॥ ६४ ॥ दोंपाखीं उड्डाण पक्षासी ॥ येक उपडिल्या नुडवे त्यासी ॥ तेविं पांत्यजितां कृष्णपक्षासी ॥ सायुज्यासी न पा
विजे ॥ ६५ ॥ ते विएकादशी पाहीं ॥ जो जागरण करी जेजे रामर्यां ॥ तो तो उपतिष्ठे माझा ठायीं ॥ संदेह नाहीं सर्वथा ॥ ६६ ॥ जो ए
कादशीचा व्रतधारी ॥ मी नित्य नांदें त्याच्या घरीं ॥ सर्व पर्वकाळांचा शिरीं ॥ एकादशी खरी पैं माझी ॥ ६७ ॥ जो एकादशी
चा व्रती माझा ॥ तो व्रतन पर्ने थींचा राजा ॥ मज आवडे गो अधोक्षजा ॥ परिग्रहो माझा तो एकु ॥ ६८ ॥ जें माझे भक्त येती घरा ॥
तें सर्व पर्वकाळ येती द्वारा ॥ वैष्णवां तो दिवाळी दसरा ॥ तीर्थे घरा पैं येती ॥ ६९ ॥ चंद्रसूर्यग्रहणासी ॥ योवाळूनि सांडी ते
दिवसीं ॥ कपिलाषष्ठी तिची दासी ॥ मा अर्धोदयासि कोण पुसे ॥ ७० ॥ ऐसें मद्भक्तांचें आगमन ॥ तेणें उल्हासें नसरें मन ॥ सर्व
स्ववें निंतां धनधान्य ॥ हरिखें जाण नाचत ॥ ७१ ॥ ऐशी माझ्या भक्तांची आवडी ॥ त्याचे संगती ची अति गोडी ॥ त्या नावभ
क्तींची कुळवाडी ॥ पर्वकोडी ते दिवशीं ॥ ७२ ॥ पर्वविशेष आदरें ॥ संत आले निअवसरें ॥ शृंगारिहरिमंदिरें ॥ गुढिया मख
रें महोत्साह ॥ ७३ ॥ संत बैसरूनि परवडी ॥ कीर्तन मांडिलें निरवडी ॥ हर्षें नाचती आवडी ॥ धरिती बागडी निन्यासें ॥ ७४ ॥
टाळमोळ मृदंग उत्सवी ॥ नानाचरित्रें गाती गजरीं ॥ गर्जती स्वानंद अवसरीं ॥ जयजयकारीं हरिनामें ॥ १२७५ ॥ ॥

श्लोक॥ यात्राबलिविधानंच सर्ववार्षिकपर्वसु॥ वैदिकी तांत्रिकी दीक्षा॥ मदीयव्रतधारणं॥३७॥ ॥ टीका॥ ऐकदीक्षेचें लक्षण॥ वै
दिकी तांत्रिकी दोन्ही जाण॥ वैदिकी वेदोक्त ग्रहण॥ तांत्रिकी जाण आगमोक्त॥७६॥ वैष्णवी दीक्षा व्रतग्रहण॥ पंचरात्रीक मंत्रानुष्ठान॥
हें आगमोक्त शुद्ध लक्षण॥ व्रतधारण तें माझें॥७७॥ वैष्णवव्रतधर्मासी॥ पर्वें करावीं वार्षिकेंसी॥ जे बोलिली चातुर्मासीं॥ एकाद-
श्यादि जयंत्या॥७८॥ शयनी कटिनी प्रबोधिनी॥ पवित्रारोपणी नीराजनी॥ वसंत दमनिकारोपणी॥ जन्मदिनी जयंत्या॥७९॥ इत्यादि
नाना पर्वकाळीं॥ महामहोत्साहीं पूजावळी॥ नीराजनें दीपावळी॥ मृदंगताळ गर्जत॥८०॥ उचंबळलेनि अतिसुखें॥ यात्रे निघावें
येणें हरिखें॥ दिंडीपताकागरुडटकें॥ नामघोषें गर्जत॥८१॥ यात्रे जावें ज्या देवासी॥ तो देवो आणी निजगृहासी॥ आपली आवडी जे मू
र्तीसी॥ ते प्रतिमेसी प्रतिष्ठी॥८२॥ ॥श्लोक॥ ममार्चास्थापने श्रद्धा स्वतः संहत्य चोद्यमः॥ उद्यानोपवनाक्रीडपुरमंदिरकर्मणि
॥३८॥ ॥टीका॥ मूर्ति निपजावी वरिष्ठ॥ नेहुगी देहुगी चोखट॥ साधुमुखें अतिनिर्दुष्ट॥ घवघवीत साजिरी॥८३॥ मूर्ति करावी अति
सुरेख॥ कृशन करावी अधोमुख॥ स्थूळ न करावी उर्ध्वमुख॥ रडकी दुर्मुख न करावी॥८४॥ आंग स्थूळ वदनहीन॥ मूर्ति न करा
वी अतिदीन॥ खेचरी भूचरी जीचे नयन॥ विक्राळवदन करावी॥८५॥ आंग साजिरें नाक हीन॥ वरदळ चांग चरण क्षीण॥ मोटळी बु
टगुली ठेंगणें ठाण॥ अतिदीर्घ जाण न करावी॥ मूर्ति साजिरी सुनयन॥ समसपोष सुप्रसन्न॥ आंगीं प्रत्यांगीं नव्हे न्यून॥ सुचि-
न्हलक्षण सायुध॥८७॥ पाहतां निवे तन मन॥ देखतां जाय भूक तान्ह॥ घवघवीत प्रसन्नवदन॥ रूपलक्षण सकुमार॥८८॥ जे देख
तां चि जीवीं जडे॥ अतिशयें सर्वांसि आवडे॥ पाहों जातां निजनिवाडें॥ पूरु चढे प्रेमाचा॥८९॥ इषित दिसे हास्यवदन॥ अतिशयें
सुप्रसन्न॥ जीचेनि घवघवाटें निवे मन॥ प्रतिमा संपूर्ण ती नांव॥९०॥ तेथें मेळऊनि साधुश्रेष्ठा॥ आज्ञोत्तारण करावें निष्ठा॥ च
क्षोन्मिळण प्राणप्रतिष्ठा॥ करावी वरिष्ठांचेनि हातें॥९१॥ देवाळय करावें गहन॥ वन उद्यान उपवन॥ खेंडकुळिया विश्रामस्थान॥ आ

रामजाणकरावें ॥९२॥ नानाजातीचेवृक्षतेवन ॥ फळभारवृक्षतें उपवन ॥ पुष्पवाटिकातें उद्यान ॥ कृष्णार्पणपूजेसी ॥९३॥ हाटहा
टवविद्याचोपासी ॥ नगरवसवावेंदेवाणासीं ॥ वेदाध्ययनशास्त्रश्रवणेंसी ॥ अहिर्निशीकीर्तनें ॥९४॥ इतुकेंकरावयाअसमर्थ ॥
श्राद्धआहेपरिनसेचित्त ॥ तरिसात्यमेळऊनसमर्थ ॥ मद्भावयुक्तकरावें ॥९५॥ कांमेळऊनिभगवद्भक्त ॥ त्यांतश्रद्धाळूजेवित्तवंत
॥ भावपूर्वकदेधल्यावित्त ॥ तेणेंहेंसमस्तकरावें ॥९६॥ देउळींकरूनिमूर्तिप्रतिष्ठा ॥ परतोनिनवचेजोत्याबाटा ॥ तोअळशीजाणा
वाकरंटा ॥ नव्हेचीरवराभावाचा ॥९७॥ जोकरूंजाणेमूर्तिप्रतिष्ठा ॥ धनवेंचूनभावार्थीमोठा ॥ नाचसेवातोमाझ्यावांटा ॥ झाडितांगं
खरांटांनसांडी ॥९८॥ ॥ श्लोक ॥ संमार्जनोपलेपाभ्यांसेकमंडलवर्तनैः ॥ गृहशुश्रूषणंमह्यंदासवद्यदमायया ॥३९॥ ॥
असतांशिष्यसेवकजन ॥ तेंप्रतिष्ठासांडूनिसन्मान ॥ स्वयेंकरीसदासंमार्जन ॥ देवालईजाणनिर्दंभ ॥९९॥ रंगमाळाघालीकुस
री ॥ नानायंत्रेंनानाकारी ॥ नानापरींचेरंगभरी ॥ आवडीभारीमद्भजनीं ॥१३०० ॥ जैसेकांनीचरंक ॥ तैसीसेवाकरीदेख ॥ नीच
सेवेसीअतिसुख ॥ निर्माइकमद्भजनीं ॥१॥ ॥ श्लोक ॥ अमानित्वमदंभित्वंकृतस्यापरिकीर्तनं ॥ अपिदीपावलोकंमेनोप
युंज्यान्निवेदितं ॥४०॥ ॥ अपारवेंचूनिनानाअर्थ ॥ प्रसादप्रतिष्ठाम्याकेलीयेथ ॥ मीएकदेवाचामोठाभक्त ॥ नधरीपोटांत
अभिमान ॥२॥ श्रद्धाभावोनाहींचित्तीं ॥ स्वदासोपआह्माचभक्ती ॥ ऐशीजेदांभिकस्थिती ॥ भक्तनातळताभाविक ॥३॥ भ
क्तेंनधरावाअभिमान ॥ नापेक्षावामानसन्मान ॥ नकरावेंदांभिकभजन ॥ अभिळाषजाणनधरावा ॥४॥ अनुभवआलातो
आपण ॥ कांदेवाळईवेंचिलेंधन ॥ अथवाजेंदेधलेंदान ॥ तेंवाच्यजाणनकरावें ॥५॥ यजमानजैंकेलेंबोले ॥ तेंकेलेंकर्मवृथा
झालें ॥ प्राणेंवीणप्रेतउरलें ॥ तैसेंझालेतेधर्म ॥६॥ कृषिवळपेरूनियांधान्य ॥ सर्वेंचि आछादीआपण ॥ तेंसबळपिकेजा
णा ॥ तैसेंफळदाननबोलतां ॥७॥ देवासिसमर्पिलेंआपण ॥ कांआणिकांकेलेंनिवेदन ॥ तेंघेऊनयेआपण ॥ देवळक

पणतोदोष ॥ ८॥ देवाचाप्रसादधनां ॥ लोभनेघावासर्वथा ॥ आधीवांटासमस्ता ॥ अल्पमात्रनास्वर्वें व्यावा ॥ ९॥ दीपुसमर्पि
लाश्रीहरी ॥ तेणेंनवर्ताविं गृहव्यापारीं ॥ हेंबोलिलेंअगमशास्त्रीं ॥ स्मृतिकारींसज्ञानीं ॥ १०॥ हेनवअनघीसाधारणबाह्यपूजा
॥ परिदृढविश्वासेभावोमाझा ॥ तेंभक्तिआवडेअधोक्षजा ॥ भाविकांचीपूजाभावार्थे ॥ ११॥ ऐकयाभक्तिचाइत्यर्थ ॥ जेणेंभजनें
म्हणिजेभक्त ॥ तरिजेंजेंउत्तमयालोकांत ॥ आवडीपदार्थमजअर्पिला ॥ १२॥ ॥ श्लोक ॥ यद्यदिष्टतमंलोकेयच्चातिप्रियमा
त्मनः ॥ तत्तन्निवेदयेन्मह्यंतदानंत्यायकल्पते ॥ ४१॥ ॥ टीका ॥ होकांचंद्रामृतनलता ॥ अवघवटें आलें भक्ताचेहाता ॥ तें अवघें
चिअर्पी भगवंता ॥ देहलोभतानसेवी ॥ १३॥ देहासियावया अमरता ॥ येणेंलोभेंसेवावेंअमृता ॥ अमर अमृतपानकरितां ॥ म
रतीसर्वथासकाळें ॥ १४॥ नेश्वरदेहाचियाममता ॥ भक्तसेवीनाअमृता ॥ तेंचिभगवंतासिअर्पिता ॥ अक्षयतानेश्वर ॥
१५॥ परिसचिंतामणिनप्रार्थितां ॥ देवेंआलेयाभक्ताच्याहाता ॥ तोलोभेंनठेवीसर्वथा ॥ अर्पीभगवंतातत्काळ ॥ १६॥ लोभें
कल्पतरूराखतां ॥ कल्पनावाढेअकल्पिता ॥ तोचिभगवंतींअर्पितां ॥ निर्विकल्पतास्वयेंवाढे ॥ १७॥ स्वार्थेंचिंतामणीराखि
तां ॥ अत्यंतहृदयींवाढेचिंता ॥ तोचिभगवंतींअर्पितां ॥ अचिंततानिवासी ॥ १८॥ कामधेनुराखतां आपण ॥ अनिवारकामना
वाढेजाण ॥ तेचिकरितांकृष्णार्पण ॥ निरपेक्षतापूर्णआंगीबाणे ॥ १९॥ लोभेंस्पर्शमणीराखतां ॥ तोवाढवीधनलोभता ॥ तोचि
भगवंतीअर्पितां ॥ अर्थस्वार्थतानिर्मुक्त ॥ २०॥ होकांदेशकाळऋतुमेळें ॥ उत्तमपदार्थअथवाफळें ॥ नवधान्यादिकें सकळें ॥ अ
र्पीभावबळेंमजलागीं ॥ २१॥ पोटांतूनिआवडता ॥ श्रमझालियापदार्था ॥ मजचिअर्पितीसर्वथा ॥ लोलिंगतासांडुनी ॥ २२॥ आ
पुलेहृदयींचीआवडी ॥ हरिचरणीलाविलीफुडी ॥ आतांनानापदार्थाचीजेगोडी ॥ तेमजचिरोकडीअर्पिती ॥ २३॥ मजअनंताच्या
हातीं ॥ आवडीअर्पिलीमद्भक्तीं ॥ त्याचींफळेंसांगतांश्रुती ॥ मुक्याहोतीसर्वथा ॥ २४॥ मीवेदांचावेदवक्ता ॥ मजहिनबोल

वेसर्वथा ॥ त्याचेंफळतेंचिमीआतां ॥ जाणतलतांउद्धवा ॥ २५ ॥ जीवाहोंनिवरुती ॥ माझ्याठायीं अत्यंतप्रीती ॥ तीयेंनावगामा-
झीभक्ती ॥ जाणनिश्चितीउद्धवा ॥ २६ ॥ तत्काळभजणविजेजेणें ॥ तेमाझेंपूजेचींस्थानें ॥ अतिपवित्रजेंकल्याणें ॥ तुजकारणें
सांगेन ॥ २७ ॥ ॥ श्लोक ॥ सूर्योऽग्निर्ब्राह्मणोगावोवैष्णवः खंमरुज्जलं ॥ भूरात्मासर्वभूतानिभद्रपूजापदानिमे ॥ ४२ ॥
टीका ॥ एकादशीएकादशाध्यायीं ॥ एकादशपूजास्थानपाहीं ॥ एकाजनार्दनुतेंहि ॥ एकरूपपाहींवर्णिलं ॥ २८ ॥ सूर्यअग्निआणि
ब्राह्मण ॥ गाईवैष्णवआणिगगन ॥ अनिळजळमहीजाण ॥ पूज्यआपणआपणासी ॥ २९ ॥ अकरावेंपूजास्थान ॥ सर्वभूतेंपू
ज्यजाण ॥ ऐकपूजेचेंविधान ॥ यथायोग्यलक्षणअवधारीं ॥ ३० ॥ ॥ श्लोक ॥ सूर्येतुविद्ययात्रय्याहविषाग्नौयजेतमां ॥
आतिथ्येनतुविप्राग्र्येगोष्वंगयवसादिना ॥ ४३ ॥ ॥ टीका ॥ सविता माझें अधिष्ठान ॥ माझेनितेजेंविराजमान ॥ जेणेंतेजें
जगाचेंनयन ॥ देखणेंजाणहोताती ॥ ३१ ॥ दीपलाविल्यागृहाभीतरीं ॥ तोप्रकाशदिसेगवाक्षद्वारीं ॥ तैसेंमाझेंनिजतेजेंअंत
रीं ॥ सूर्यद्वारींप्रकाशे ॥ ३२ ॥ तोसविता मंडळमध्यवर्ती ॥ जाणनारायणमी निश्चिती ॥ त्यामजसूर्याचीउपपत्ती ॥ सो स्मृनि
श्रितंत्रैविद्या ॥ ३३ ॥ ऋग्वेदादिवेदतीनी ॥ सांगसोरसमन्त्रजाणोनी ॥ सूर्यसूक्तें सन्मुखपठणी ॥ पूजासज्ञानीकरावी ॥ ३४ ॥ हे
देवकीउगासकता ॥ वेदज्ञासीचितलता ॥ नेणत्यायोग्यनव्हेराविता ॥ ऐसेंसर्वथानह्मणावें ॥ ३५ ॥ तत्काळप्रसन्नहोयस
विना ॥ ऐशीऋगमउपासकता ॥ तुजसांगेनआतां ॥ सावधानताअवधारीं ॥ ३६ ॥ सकळवेदांचीजननी ॥ सकळमंत्रांचामु
गुटमणी ॥ तेगायत्रीउत्तमवर्णी ॥ सकळब्राह्मणीं जाणिजे ॥ ३७ ॥ तीचाअर्थविचारितां ॥ तीआर्धानअसेसविता ॥ त्रिप
दात्रिकाळींअर्घ्यदेतां ॥ त्रैविद्यातलतात्यानाव ॥ ३८ ॥ अर्धमात्राअर्धबिंबध्यान ॥ त्रिपदात्रिकाळीअर्घ्यदान ॥ तेणेंसं
तोषेंचिद्वान ॥ आपणासमानजनकरी ॥ ३९ ॥ हेंप्रथममाझेंअधिष्ठान ॥ सूर्यपूजायाचिनावजाण ॥ आतांअग्निपूजेचें

लक्षण ॥ सांगसंपूर्णतें एक ॥ ४० ॥ सर्वांगामुखप्रधान ॥ तें तुझें मुख अग्नी जाण ॥ ये अर्थीं वेद शास्त्र पुराण ॥ साक्ष जाण गर्जताती ॥ ४१ ॥ ब्राह्मणमाझें आवडतें ॥ माझे मुखीं हूनि सरतें ॥ त्यालागीं विलें अग्नि सेवितें ॥ तें हि तेथें चूकलें ॥ ४२ ॥ घालूनि मज मुखीं अवदान ॥ इंद्रादि स्वाहा म्हणती जाण ॥ कर्मकांडें ठकिले ब्राह्मण ॥ शुद्ध मदर्पण चूकले ॥ ४३ ॥ केवळ मज मुखीं अर्पितां ॥ -आड घालिती त्यांची योग्यता ॥ इंद्र यम वरुण सविता ॥ नाना विकल्पता अवदानीं ॥ ४४ ॥ देवों देवीं मीचि आहें ॥ हें हि सत्य न मनिती पाहें ॥ मज वेगळा विनियोग होये ॥ नवल काय सांगावें ॥ ४५ ॥ जें जें सेविजे तिहीं लोकीं ॥ तें तें अर्पे माझ्या मुखीं ॥ हें न मनिजे याज्ञिकीं ॥ कर्माविखीं विकल्प ॥ ४६ ॥ विकल्पबुद्धी ब्राह्मण ॥ अयथार्थ संशयीं पडिले जाण ॥ करूनि वेदशास्त्र पठण ॥ शुद्ध मदर्पण बोलती ॥ ४७ ॥ माझें मुख वैश्वानर ॥ येणें भावें विनवेन र ॥ सांडूनि भेद देवतांतर ॥ मजचि साचार अर्पिती ॥ ४८ ॥ त्यांचे समिधान्नें मन तृप्त झालें ॥ तेथ ही जरी हविर्द्रव्य आलें ॥ तरि माझें निजसुख सुखावलें ॥ सर्वस्व आपुलें त्यासि दें ॥ ४९ ॥ जन नैराश्य त्यांचा आस ॥ त्याच्या हावाची पाहे वास ॥ त्यालागीं सदां सावकाश ॥ अल्प ही ग्रास जें देती ॥ ५० ॥ त्याचेनि होतें निर्विकल्पें ॥ मद्भावें जें अग्नीस अर्पे ॥ तृण काष्ठ तिळ तुपें ॥ तें म्यां चिद्रूपें सेविजे ॥ ५१ ॥ या परी अग्नीची उपास्ती ॥ जे दुजे स्थानींची पूजास्थिती ॥ सांगीतली म्यां तुज प्रती ॥ ब्राह्मणा मतें अवधारीं ॥ ५२ ॥ पूजे माजी अतिश्रेष्ठ जाण ॥ शीघ्र मत्प्राप्तीचें कारण ॥ ब्राह्मण माझें पूजास्थान ॥ अतिगहन उद्धवा ॥ ५३ ॥ याचिया मजनाची नवल परी ॥ आड पडावें देखोनि दुरी ॥ मस्तक ठेवावा नरणावरी ॥ चरणरज शिरीं वंदावे ॥ ५४ ॥ आवाहन विसर्जन ॥ शाळिग्राम माझें अधिष्ठान ॥ परि तें केवळ अचेतन ॥ ब्राह्मण सचेतन मद्रूपें ॥ ५५ ॥ मी अव्यक्तरूपें जनार्दन ॥ तो मी व्यक्तरूपें जाण ॥ धरातळीं मी असें नारायण ॥ धरामर ब्राह्मण यालागीं ॥ ५६ ॥ ब्राह्मणमुखें वेदांसि महिमा ॥ यज्ञदान तीर्थांसि गरिमा ॥ ब्राह्मण देवांसि परमप्रेमा ॥ ब्रह्मत्व ब्रह्मा ब्राह्

णमुखें ॥ ५७॥ त्याब्राह्मणासी अपमानितां ॥ अपमानिल्यायज्ञदेवना ॥ वेदादितपदानतीर्थां ॥ परब्रह्मनत्वना अपमानिलें ॥ ५८ ॥ मज
भेलोकांनाहींसांठवण ॥ मजहूनिअधिकमाझेंब्राह्मण ॥ त्यामाजीमीवेदरूपनारायण ॥ सगळाजाणसांठवलों ॥ ५९॥ ब्रा-
म्हणपदत्ददयींधरितां ॥ मजआलीपरमपवित्रता ॥ लक्ष्मीपायांलागेउपेक्षितां ॥ चरणतीर्थमाथांशिउन्हरी ॥ ६०॥ यालागि
ब्राह्मणपूज्यजाण ॥ आंगेंमीकरींचरणक्षालना ॥ त्याचेंउच्छिष्टमीकाढीं आपण ॥ पाडूंकोणइतरांचा ॥ ६१॥ मुख्यमाझें
अधिष्ठान ॥ सर्वांपचारपूजास्थान ॥ दानमानमिष्टान्न ॥ विधिपूजनविप्राचें ॥ ६२॥ एकानेमुशाळिग्रामाचा ॥ एकास्थानर
लिंगाचा ॥ एकानेमुगणेशाचा ॥ एकासूर्याचादर्शननेमू ॥ ६३॥ एकानेमुतुळशीचा ॥ एकाबांधल्याअनंताचा ॥ नित्यनेमस्त
ब्राह्मणाचा ॥ सभाग्यभाग्याचादुर्लभ ॥ ६४॥ नित्यनेमस्तगुरुपूजा ॥ षोडशोपचारेंकरीपूजा ॥ माझेनकीचातोराजा ॥ आ
त्मामाझातोएकु ॥ ६५॥ जोदेवतांतरानुपासिना ॥ जीवेंभावेंब्राह्मणभक्त ॥ त्याचाचुकऊनियांअनर्थ ॥ निजस्वार्थमीकर्ता ॥ ६६
॥ ऐसेजेब्राह्मणभक्त ॥ त्याच्यापायींपृथ्वीपुनित ॥ गंगाचरणतीर्थवांछित ॥ गिरींवंदनमीत्यासी ॥ ६७॥ त्याचेसवेंचासेव
कं ॥ मोलेवीणमीझालोंदेख ॥ ब्राह्मणसेवेचेंमजसुख ॥ अलौकिकआनिवार ॥ ६८॥ नित्यनेमस्तहरिपूजा ॥ करीतोआव
डेअधोक्षजा ॥ यालागिपसरूनिचारिभुजा ॥ आलिंगनीमाझाजीवनिवे ॥ ६९॥ ब्राह्मणाच्यास्नानप्रवाहानळीं ॥ जेणेंमाथा
थेंकेलीआंघोळी ॥ कोटिअवभृतपायांतळीं ॥ तेणेंतत्काळींघातलीं ॥ ७०॥ ब्राह्मणचरणतीर्थदेखनां ॥ पळसूदेदोषदुरि
ता ॥ तेंमावार्थेंतीर्थघेतां ॥ दोषसर्वथानिमाले ॥ ७१॥ जोकोणीनित्यनेमस्त ॥ सेवीब्राह्मणान्हेंचरणतीर्थ ॥ तोस्वयेंझाला
तीर्थरूपसत्य ॥ त्याचेंनितरतीजडजीव ॥ ७२॥ याब्राह्मणाचेठायींजाण ॥ अभ्यंगादिस्नानचंदन ॥ आसनभोजनध
नधान्य ॥ शक्तिप्रमाणपूजेसी ॥ ७३॥ ब्राह्मणासिप्रियभोजन ॥ दानींश्रेष्ठअन्नदान ॥ निफजउनियांमिष्टान्न ॥ यावेंभो

जनमझावें ॥७४॥ एकहेळसूनिदेती अन्न ॥ येंकउबगल्यासाठींजाण ॥ एकदेती निर्भर्त्सून ॥ एकवसवसोनिघालिती ॥ १२७५ ॥
तैसें नकरावें आपण ॥ ब्राह्मणमाझें स्वरूपजाण ॥ त्यासिदेइनियांसन्मान ॥ द्यावें भोजनयथाशक्ति ॥ ७६ ॥ अज्ञान अतीतआ
ल्यासमयीं ॥ खोटीकाढूंनयेत्याचाठायीं ॥ तोहिमाझें सरूपपाहीं ॥ अन्नतेसमयींअर्पावें ॥ ७७ ॥ अतीतजातांपराङ्मुख ॥
त्यासतेजायपुण्यनिःशेष ॥ अन्नद्यावेंसमयीं अशेष ॥ नातरीउदकतरीद्यावें ॥ ७८ ॥ ब्राह्मणबैसऊनिपंक्ती ॥ जेकाणीपंक्तीभे
दकरिती ॥ तेमोलेंपापविकतघेती ॥ त्यासिअधोगतीनिश्चितें ॥ ७९ ॥ ब्राह्मणसेवेलागिंजाण ॥ कायावाचामनधन ॥ यथासा
मर्थ्येंअर्चन ॥ अतिथीपूजनत्यानांव ॥ ८० ॥ त्रिपदाजपेंपवित्रपूर्ण ॥ म्हणोनिवेदांचेंनिवासस्थान ॥ ब्राह्मणमाझेंस्वरूपजाण
॥ श्रेष्ठअधिष्ठानपूजेचें ॥ ८१ ॥ ब्राह्मणपूजेच्यामार्गींजाण ॥ अतिसादरउत्थानेंमन ॥ दृष्टीदेववर्णींदान ॥ श्रद्धासंपूर्णयानांव ॥ ८२ ॥
ब्राह्मणसेवाधनेंविणें ॥ सर्वथानघडेऐसेंनह्मणें ॥ सेवेसि श्रद्धाप्रमाण ॥ उल्हाससंपूर्णभजनाचा ॥ ८३ ॥ एकाचीशरीरेंसे-
वाजाण ॥ एकाचेंवाचीकपूजन ॥ एकाचेंमानसीकभजन ॥ दयापूर्णद्विजांचें ॥ ८४ ॥ ब्राह्मणभक्तिच्यालागिंजाण ॥ हर्षेंनिर्भरअंतःकर
ण ॥ श्रद्धायुक्तउल्हासपूर्ण ॥ अतिथ्यजाणयानांव ॥ ८५ ॥ यापरीब्राह्मणभजन ॥ तिसरेंपूजेचेंअधिष्ठान ॥ हेंसांगीतलेंजाण ॥
गोसुश्रूषणतेंऐक ॥ ८६ ॥ जोगाईचाकेंवारा ॥ घायेंसहस्रबाहोकेलापुरा ॥ तोनसाहतकेंवसंधरा ॥ मुख्यधुराम्यामारिल्या ॥ ८७ ॥
रामवतारींअतिमहिमान ॥ तेंनघडेचिगोसुश्रूषण ॥ यालागिंगोकुळींजाण ॥ गाईचेंसेवनम्याकेलें ॥ ८८ ॥ गाईचेसेवेंझालीसृष्टी
॥ बाळपणीमारिलेजेठा ॥ कंसचाणूरमारिलेहटी ॥ बैसविलाराज्यपदींउग्रसेन ॥ ८९ ॥ गाईचेंसेवेनि अतिगोड ॥ तेणेंमाझीकीर्ति-
झालीचोखडी ॥ फोडिलीकंसाचीबांदोडी ॥ तोडिलीबेडीपितरांची ॥ ९० ॥ यालागींगाईब्राह्मण ॥ माझाजाणजीवप्राण ॥ माझें
पूजेचेंअधिष्ठान ॥ सत्यभजाणइयेंदोन्ही ॥ ९१ ॥ आसकाचींगोरक्षण ॥ करितांपदिव्यंनामजजाण ॥ त्यासवेंमीआपण ॥ गोरक्ष

णकरीतसे ॥ ९२ ॥ गाईचेंसेवेचेंविधान ॥ गोग्रासघ्यावाजेतृण ॥ करावेंआंगकुरवाळण ॥ इतुकेनप्रसन्नमीहोयें ॥ ९३ ॥ निर्लो
भागाईंचीसेवा ॥ करितांमाझीप्राप्तीउद्धवा ॥ एकवैष्णवांचीसेवा ॥ पूजासद्भावाविभागू ॥ ९४ ॥ ॥ श्लोक ॥ वैष्णवेबंधुसत्कृत्या
हृदिखेध्याननिष्ठया ॥ वाय्वौमुख्यधियातोयेद्रव्यैस्तोयपुरस्कृतैः ॥ ४४ ॥ ॥ टीका ॥ वैष्णवसेवाअत्यंतकठिण ॥ तेथेंजातिचें
नाहींगाप्रमाण ॥ ब्राह्मणाचाशूद्रब्राह्मण ॥ भक्तिप्राधान्यभावार्थे ॥ ९५ ॥ विदुरदासीपुत्रप्रसिद्ध ॥ त्यासिआवडलागोविंद ॥ ज्ञा
लावैष्णवांमाजीअतिशुद्ध ॥ केंसेनिनिंद्यब्राह्मणाचा ॥ ९६ ॥ यांनिजन्मलामर्कट ॥ तोवैष्णवांमाजीश्रेष्ठ ॥ हनुमंतब्राह्मणापाकनिष्ठ
॥ ऐसापापिष्टकोणआहे ॥ ९७ ॥ राक्षसांमाजीबिभीषण ॥ दैत्यांमाजीप्रल्हादजाण ॥ भगवंतासीअनन्यशरण ॥ वैष्णवपण
तेणेंत्यासी ॥ ९८ ॥ जातीउत्तमभक्तिहीन ॥ तोवैष्णवनव्हेजाण ॥ अथवाकरीदांभिकभजन ॥ वैष्णवपणत्यानाहीं ॥ ९९ ॥ वैष्ण
वमानीजातीप्रमाण ॥ शालिग्राममानीपाषाण ॥ गुरूसिमानीमाणुसपण ॥ तोपापिष्टजाणसर्वथा ॥ १४०० ॥ जाणीवशाह
णीवज्ञानेंपण ॥ सांडूनिजातिचाअभिमान ॥ जोमजहोयअनन्यशरण ॥ वैष्णवजाणतोमाझा ॥ १ ॥ त्यावैष्णवाचेंपूजन ॥ बा
ह्यउपचारनव्हेजाण ॥ बंधुस्नेहेंकळवळीमन ॥ साचारपूजनत्यानांव ॥ २ ॥ एकसख्याबंधूचास्नेहो ॥ बंधूसिरणींलागतांघा
वो ॥ घायाआडस्वयेंरिगोनिपहाहो ॥ शत्रुसमुदावोविभांडी ॥ ३ ॥ तैसापोटींआंतकळवळा ॥ तोचिवैष्णवपूजेचासोहळा ॥
स्नेहेंवीणटिळेमाळा ॥ करवगोपाळातेणेंनव्हे ॥ ४ ॥ एकापितयाचेपुत्रसाधू ॥ अकृत्रिमहोतीबंधू ॥ माजीसापत्नविरोधू ॥ स्ने
हशुद्धतांनव्हे ॥ ५ ॥ भक्ताअभक्तांउत्पत्ती ॥ मजपासूननिश्चितीं ॥ भावाभावसापत्नभ्रांती ॥ विरुद्धस्थितीपरस्परें ॥ ६ ॥ वैष्णव
विष्णुउदरींजाण ॥ तेउदरींऔरसत्यांचेंआपण ॥ तेंसद्गजेंझालेंसरतेपण ॥ अकृत्रिमजाणकळवळा ॥ ७ ॥ ऐसाबंधुस्नेहेंजो
कळवळा ॥ तेचिपूजावैष्णवकुळा ॥ वैष्णवपूजकाजवळा ॥ भावेंफळलाभीनिष्टें ॥ ८ ॥ वैष्णवपूजेचेंलक्षण ॥ तेंपांचवेंमासेंअ

धिष्ठान ॥ ऐक आकाशाचें पूजन ॥ केवळ माझें ध्यान तेठायीं ॥ ९ ॥ आकाश निर्लेप निर्विकार ॥ अतिसूक्ष्म निराकार ॥ तैसें माझें ध्या
न निरंतर ॥ हृदयीं साचार करावें ॥ १० ॥ ध्यानीं बैसोनि सावकाश ॥ सगळें सर्व महदाकाश ॥ जो आपुलें करी हृदयावकाश ॥ तेणें मी
परेश पूजिला ॥ ११ ॥ अतिसूक्ष्म निर्विकार ॥ हृदयीं भासे ध्यान सधर ॥ तेचि पूजा साचार ॥ अपरंपार मी पूजिला ॥ १२ ॥ आका
शा लेप लाऊं जातां ॥ लावितां न लागे सर्वथा ॥ तेविं सर्व कर्मीं वर्ततां ॥ आपुली मुक्तता जो देखे ॥ १३ ॥ आकाश सर्व पदार्थीं व्याम ॥
व्याम असोनि अलिप्त ॥ तेविं सर्व कर्मीं वर्तत ॥ कर्मातीत नभनिष्ठा ॥ १४ ॥ आकाश माझें पूजास्थान ॥ तेथील पूजेचें जें विधान ॥ हें
साहावें पूजा अधिष्ठान ॥ वायूचें अर्चन तें ऐक ॥ १५ ॥ वायूचा ठायीं भगवद्बुद्धी ॥ ज्याची चळूं नेणे कधीं ॥ वायु चाळी भूतां चळनसिद्धी
जगातें त्रिशुद्धी धरिता तो मी ॥ १६ ॥ वायुरूपें मी विजाण ॥ झालों सर्व भूतांचा प्राण ॥ प्राणाचा मी मुख्य प्राण ॥ मद्रूपें पवन या
हेतू ॥ १७ ॥ वायू व्योमीं जन्म पावे ॥ जन्मोनि व्योमा वेगळा नव्हे ॥ सर्व कर्में तैसेंचि संभवे ॥ अंतीं स्थिरावे निज व्योमीं ॥ १८ ॥ तेविं ज
न्म कर्मा निदान ॥ पावोनि न सांडी अधिष्ठान ॥ प्राणाचा जो होय प्राण ॥ हें निजपूजन वायूचें ॥ १९ ॥ प्राणाचें गमनागमन ॥ तेथ सोहं
हंसाचें नित्य ध्यान ॥ तें चि करितां नित्य सावधान ॥ हें चि पूजन वायूचें ॥ २० ॥ मद्रूपें दृढ भावन ॥ वायुचें जो करी आपण ॥ तें पव-
नाचें पूजन ॥ पूजास्थान सातवें ॥ २१ ॥ जीवा जीववी जीवन ॥ त्या जीवना [illegible] निजजीवन ॥ जीवनें पूजिजे जीवन ॥ जेविं समुद्र पूज
न तरंगीं ॥ २२ ॥ नद्यस्तृप्यंतु समुद्रस्तृप्यंतु ॥ देह जळें चि जळ पूजिजेत ॥ पूज्य पूजक एकत्व येथ ॥ हेचि वेदोक्त विधिपूजा ॥ २३ ॥
जीवनजीवनाची पूजा ॥ जीवनें चि निपजे वोजा ॥ ते पूजा पावे अधोक्षजा ॥ तो भक्त मज्ञापदीं यंता ॥ २४ ॥ आपो नारायण साक्षा
न ॥ या मंत्राचा जो मंत्रार्थ ॥ देवें देवो चि पूजिजेत ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ १४२५ ॥ क्षीरें पूजिला क्षीरसागर ॥ तेविं द्रव्यें द्रव्योप-
चारु ॥ हा जीवनपूजाप्रकारु ॥ जाण निर्धारु उद्धवा ॥ २६ ॥ जीवनें पूजिजे जीवन ॥ हें आठवें पूजास्थान ॥ ऐक पृथ्वीचें पूजन ॥ –

श्लोकार्थीसंपूर्णसांगेन॥२७॥ ॥श्लोक॥स्थंडिलंमंत्रन्हृदयेभोगैरात्मानमात्मनि॥क्षेत्रज्ञंसर्वभूतेषुसमत्वेनयजेनमां॥४५॥
टीका जळामाजीधराअधर॥विरोनिहोपाहेनीर॥तैमाजीमीप्रवंशलोंधराधर॥अधरतेसधरतेणेंझालों॥२८॥यालागींपृथ्वी
माजीपूजास्थान॥ऐकपूजेचेंविधान॥गोसदृशस्थंडिलजाण॥आवाहनपैमाझें॥२९॥गोसदृशस्थंडिलीकांक्षणसी॥पृ
थ्वीआहेगाइच्यापैशी॥जेंपूजाकरावीपडेतिसी॥तेंनदाकासेंसिस्थंडिल॥३०॥तेस्थंडिलींपूजावयाधरा॥आवाहनकरावेंधरा
धरा॥तल्लिंगत्हृदयमंत्रा॥मंत्रद्वारांपूजावी॥३१॥त्हृदयकवचशिखानेत्र॥शक्तीबीजमंत्रास्त्र॥स्थंडिलीरेखूनियायंत्र॥धरा
धरमहापूजा॥३२॥यापरीपृथ्वीपूजन॥सांगसांगीतलेंजाण॥आपुलेंआपणपूजास्थान॥दाहवेंलक्षणतेंऐक॥३३॥आधी
एकपुढेंपूर्ण॥त्यानावदाहावेंलक्षण॥आपलेंआपणपूजास्थान॥विचित्रविंदाणपूजेचें॥३४॥पूज्यापुढेंपूज्येंकोटी॥केल्या
गणितासीपडेतुटी॥पहिल्यापूज्यासीजेंफांटाउठी॥तोगणितसृष्टीअसंख्य॥३५॥पूर्णासिफांटाकादिजे॥त्यानावएकह्मणि
जे॥एकपणेंहिपूर्णअसिजे॥सहजनिजेपरिपूर्ण॥३६॥पूर्णापुढेंपूर्णपडे॥तेंगणितकायआतुडे॥जेंनिचाडाचाडवाढे॥तेंनिज
निवाडेंपाविजे॥३७॥येकासियेकमेळविजे॥तेंदोनीपणेंहोयदुजें॥जेंएकेंएकआगिजे॥तेंदेखिजेनिजपूज्य॥३८॥आपणचि
आपलादेवो॥आपलापूजकआपणपाहाहो॥आपलाआपणचिभावो॥नवलनवलावोपूजेचा॥३९॥त्हृदयींमाउनीचैत
न्यघन॥स्वयेंतद्रूपहोऊनिजाण॥मगजेंभोगभोगीआपण॥ब्रह्मार्पणसहजेंची॥४०॥तोग्रासघालीस्वमुखीं॥तेणें
मुखेंमीहोयसुखी॥तृप्तिउपजेपरमपुरुखां॥पूजानेटकीहेमाझी॥४१॥तोजेंजेकाहींभोगभोगी॥तेंअर्पतिमजचिलागीं
॥मीरंगलोंत्याचेरंगीं॥पावेश्रीरंगीतेपूजा॥४२॥मुख्यपूजेमाजीहेपूजा॥तेणेंपूजिलेंमजवोजा॥पूजामिसेंगरुडध्व
जा॥अधोक्षजातेणेंकेलें॥४३॥हेआवडतीमाझीपूजा॥अत्यंतप्रियअधोक्षजा॥हेभक्तिपदियेंतेंअधोक्षजा॥जाण

तोमाझाप्रियभक्त ॥ ४४ ॥ होकांसगुणअथवानिर्गुण ॥ दोहींरूपेंमीनिजाण ॥ तेथजोकरीनिजभोगअर्पण ॥ शुद्धपूजनतेंमा
झें ॥ ४५ ॥ निजात्मभोगींअधोक्षजा ॥ पूजिजेतेंहेंजाणपूजा ॥ सर्वभूतातेंजाणिजेवोजा ॥ समसाम्यसमजासमभावें ॥ ४६ ॥ अक
रानेपूजेचाविवेक ॥ मागंपुढांएकएक ॥ अकराइंद्रियांपडेआंख ॥ तोचिपूजकसर्वभूतां ॥ ४७ ॥ मागंपुढांएकएककीजे ॥ त्याना
वएकादशह्मणिजे ॥ होचिविवेकजेणेंजाणिजे ॥ तेणेंपूजिजेसर्वभूतां ॥ ४८ ॥ आत्मभोगसदर्पणपाहीं ॥ वस्तूजाणितलीस्वदेहीं ॥
तोचिसर्वभूतांच्याठायीं ॥ देहविदेहींसमसाम्यें ॥ ४९ ॥ सर्वक्षेत्रांतेंचागविता ॥ मीक्षेत्रज्ञजाणतलना ॥ देखतांहीविषमभूतां ॥
ज्याचीसमतामोडेना ॥ ५० ॥ उंचनीचविषमन्यूनता ॥ वस्तूसिनदेखेविषमता ॥ समसाम्यदेखेसमस्ता ॥ सर्वभूतांसमत्वें
॥ ५१ ॥ माझियासाम्येंसर्वसमता ॥ तेपूजासर्वभूतां ॥ तोचिपूजकतत्वतां ॥ ज्यासिविषमताबाधेना ॥ ५२ ॥ जोभावार्थेंभ
जमाजिआला ॥ तेंसर्वभूतेंतोचिझाला ॥ समत्वेंसहजपावला ॥ पूज्यपूजाआत्मत्वें ॥ ५३ ॥ पूजूंजाणेरंकरावो ॥ परिणालंदना
समभावो ॥ नसांडितांसमतेचाठावो ॥ यथायोग्यपाहातोपूजित ॥ ५४ ॥ ऐसेंयदुवंशध्वजा ॥ सर्वभूतींमाझीपूजा ॥ माझे-
निसमत्वेंनिफजेवोजा ॥ या अकराहिपूजासमत्वें ॥ ५५ ॥ इयेंअकराहिअधिष्ठानें ॥ मत्स्वामीकरअतिपावनें ॥ म्यांसांगीतलें-
अनुसंधानें ॥ पूजाकरणांयथाविधी ॥ ५६ ॥ म्यांसांगीतलेंजातिगुती ॥ पूजाकरावीत्याचीस्थिती ॥ सर्वार्थींमाझीमूर्ती ॥ स्फ-
वित्तचित्तींचिंतावी ॥ ५७ ॥ ॥ श्लोक ॥ धिष्ण्येष्वेष्विति मद्रूपं शंखचक्रगदाम्बुजैः ॥ युक्तं चतुर्भुजं शान्तं ध्यायन्नर्चेत्समा
हितः ॥ ४५ ॥ ॥ टीका ॥ निर्गुणाहूनिसगुणन्यून ॥ ह्मणोनीकेंवळमूर्खजाण ॥ सगुणनिर्गुणदोनीसमान ॥ न्यूनपूर्णअसे
ना ॥ ५८ ॥ विघुरलेंतेंतूपहोय ॥ थिजलेंत्यापरीसगोडआहे ॥ निर्गुणपरीससगुणीपाहें ॥ अतिलवलाहेंस्वानंदू ॥ ५९ ॥ नि
र्गुणाचाबोधकठिण ॥ मनबुद्धीवाचेअगम्यजाण ॥ शास्त्रांसिनकळेखूण ॥ वेदींमौनधरियेलें ॥ ६० ॥ तारारमाणोवावांचे ॥

आकाशआकळावेंरवेवें॥भावनाभांबावलीधांवे॥कायथरावेंस्फुरेना॥६१॥तैशीसगुणमूर्तीनव्हेजाण॥सलभआणीसलक्षण
॥देखतांजायमूकनान्ह॥निवतहेमनसप्रेमें॥६२॥जोनित्यशुद्धसच्चिदानंद॥प्रकृतीपरपरमानंद॥सगुणजाहला निजगोविंद॥
स्वानंदकंदस्वलीला॥६३॥साखरेचागोडीवाखाणिली॥तिचीनाबदनिगुतीकेली॥गोडियेअधिकशोभली॥तैशीझालीसा-
कार॥६४॥लाउनियांकसवटी॥उत्तमसुवर्णाचीरवोटी॥बांधल्यानववधूच्याकंठी॥तेणतेगांमटीदिसेकाय॥६५॥त्या
चीचकरुनियांभूषणें॥आंगींप्रत्यांगींबाणलेंलेणें॥नववधूशोभलीतेणें॥निंबळोणेंउतरिती॥६६॥तैसेंजेंनिर्गुणनिर्विकार
॥त्याचीसगुणमूर्तीसुकुमार॥चिन्मात्रैकअतिसुंदर॥मनोहरस्वलीला॥६७॥घवघवितघनसांवळा॥मुकुटकुंडलेंमेरव-
ळा॥कंठींकौस्तुभवनमाळा॥सोनसळाझळकत॥६८॥आधींचनोअतिसांवळा॥वरिटिळकरेखिलापिवळा॥आरक्ततांये
हींगोळा॥कमकदळालाजवी॥६९॥चिन्मात्रींचेंदेखणेंपण॥त्याडोळ्यां आलेंशरण॥सैराटहिंडताशिणलापवन॥हरिचें
घ्राणठांकला॥७०॥जैशाओंकारामाजीश्रुती॥तैशामुखामाजीदंतपंक्ती॥चौकीचेचारीझळकती॥सच्चिदानंदसोलिव॥
७१॥जेविंजीवशिवभिन्नपणी॥तेंविंअधरऊर्ध्वअधरदोन्ही॥हरिआंगींमिळालेमिळणी॥समानपणींसमलें॥७२॥देखोनियां
कृष्णावदन॥चंद्रमाकृष्णापक्षींक्षिण॥तोतंवपूर्णमेसीपूर्ण॥सदासंपूर्णवदनेंदु॥७३॥दिनसाचंद्राचीसीणप्रभा॥वदनेंदूची
नवलशोभा॥लोपोनिचंद्रसूर्यप्रभा॥स्वयेंस्वयंभाप्रकाशे॥७४॥तोआर्तचकोराअमृतपान॥मुमुक्षुचातकास्वानंदघन॥सगु-
णपणेंनारायण॥भूषणाभूषणतोझाला॥७५॥चहूंखाणीचाक्रियाविविधा॥तैशाचहूंभुजीउदायुधा॥सगुणदेखोनिगोविंदा
॥वेदनिजबोधाआयुधेंझाले॥७६॥देवोनकळेश्रुतीसी॥लाजआलीहोतीवेदासी॥निजमिरवावयाप्रभूतापासी॥आयुधेंहरिपा-
सींतेझालें॥७७॥सामवेदझालाशंख॥यजुर्वेदचक्रदेख॥अथर्वणगदातिख॥कमळसाजुकऋग्वेदू॥७८॥साकारपणेंस

चिदानंदा ॥ शंखचक्रपद्मगदा ॥ चहूं करीं चहूं वेदां ॥ निववी सदा निजांगें ॥ ७९ ॥ जगीं मिरवा वयाउपनिषदें ॥ झालीं बहु भूषणें अ
गदें ॥ करीं कंकणें अतिशुद्धें ॥ सोहंशब्दें रुणझुणती ॥ ८० ॥ नखकेश अंगुलिका ॥ कराग्रीं जडित मुद्रिका ॥ त्रिकोण षट्कोण या
देखा ॥ उपासकां विधीपीठ ॥ ८१ ॥ अगम्य तें जहृदयींच्या पदका ॥ गुणत्रिवेणी उदरीं देखा ॥ मध्ये कच्छा सूनेटका ॥ क्षुद्र घंटिका मे
खळे ॥ ८२ ॥ कांतीं व मर्गजस्तंभ जाण ॥ तैसे शोभताती दोन्ही चरण ॥ ते केवळ अचेतन ॥ हे सचेतन हरिआंगीं ॥ ८३ ॥ ध्वज वज्र
अंकुश ऊर्ध्वरेखा ॥ दोन्हीं पाईं पद्मरेखा ॥ यवांकीत सामुद्रिका ॥ अतीनेटका पदबंधू ॥ ८४ ॥ आरक्तरंग चरणतळां ॥ वरिल घनसांव
ळी कळा ॥ नभीं इंद्रधनुष्य मेळा ॥ तैसी लीळा हरिचरणीं ॥ ८५ ॥ सगुण देखोनियां जगन्नायका ॥ दशदिशा सीचरणीं आवाका
पावावया निजसुखा ॥ दशांगुळीं का होऊनि ठेल्या ॥ ८६ ॥ चंद्र कृष्णपक्षीं क्षीण ॥ तेणें ठाकिले हरिचरण ॥ नखीं चंद्र जडोनियां जाण ॥
परमपावन तो झाला ॥ ८७ ॥ हें जाणोनी त्रिनयनें ॥ चंद्र मामस्तकीं धरणें ॥ पायवणी माथां वाहणें ॥ जगउद्धरणें तेणें झालें ॥ ८८ ॥ स
गुणदेवो देखोनि पाहीं ॥ चारी मुक्ती लागल्या पाईं ॥ यालागीं संतचरणाचा ठाईं ॥ तत्पर पाहीं सर्वदा ॥ ८९ ॥ सलोकता रामीपता ॥
दोहीं पाईं वांकीं गर्जना ॥ अंदू झाली स्वरूपता ॥ सायुज्यता तोडरु ॥ ९० ॥ त्या तोडराचा धाक पाहीं ॥ अहंगर्व न मस्कर या हाती देहीं ॥
सर्व सुख तें हरिच्या ठाईं ॥ त्याचा पायीं समाधी ॥ ९१ ॥ धैर्य वीर्य उदारकीर्ती ॥ गुणगंभीर शौर्य ख्याती ॥ यासी कारण माझी सगुणमू
र्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९२ ॥ माझें येमूर्तीचें निदर्शनें ॥ होतडोळ्यां पारणें ॥ उठी जन्ममरणाचें धरणें ॥ खत फाडणें विषयांचें
॥ ९३ ॥ माझी मूर्ती देखिल्या पाठीं ॥ न लगे योमयाग आटाआटी ॥ न लगे घोर घावें गिरीकपाटीं ॥ नाना संकटीं न पडावें ॥ ९४ ॥ न लगे
आसन ध्यान ॥ न लगे समाधी साधन ॥ माझी ये प्राप्तीसी कारण ॥ माझी भक्ती जाण उद्धवा ॥ ९५ ॥ एकादशपुजा अधिष्ठान ॥ ते
थें माझें करोनी आव्हान ॥ त्यां सांगतलें मूर्तीचें ध्यान ॥ सावधान करावें ॥ ९६ ॥ माझें अर्चन माझें ध्यान ॥ माझें करावें कीर्तन ॥ मा

ज्ञानामाचेंनामस्मरण ॥ माझेंगुणवर्णावे ॥ ९७ ॥ अहिर्निशीमाझीकथा ॥ अहिर्निशीमाझीवार्ता ॥ अहिर्निशीमातेंध्याना ॥ मन्कीन
लतांतीनांव ॥ ९८ ॥ दीपकळिकाहातींचढे ॥ तेंघराभीतरीप्रकाशूसांपडे ॥ माझीमूर्तीजिं ध्यानीजडे ॥ तेंचैतन्यआतुडे अवघेंची ॥ ९९ ॥
याउपपत्तीउद्धवादेख ॥ सगुणनिर्गुणदोन्हींयेक ॥ जाणपांनिश्चयोनिष्टंक ॥ सच्चिदानंदस्वरूपसमखें ॥ १५०० ॥ जोकसूस्रवर्णाचीये-
रवांटी ॥ तोचिवालायेकाकसवटी ॥ सगुणनिर्गुणपरिपाठीं ॥ नाहींतुटीचित्स्वरूपा ॥ १ ॥ तेंविसगुणनिर्गुणनिःशेष ॥ जाणनिश्चयेंदो
न्हींएक ॥ समजेसारखेंनेंटेक ॥ नानवटांकसमगोडी ॥ २ ॥ हेंअंतरंगमाझेंध्यान ॥ तेथेंमनकरोनीसावधान ॥ अतीहर्षेंमदर्पण ॥ म
द्भक्तीजाणकरावें ॥ ३ ॥ उद्धवाऐसेंलक्षणसीमनी ॥ हेभक्तिपावेजेकेंसोनी ॥ हेंसाध्यहोयजिहींसाधनीं ॥ तेंतुजलागोनीसांगेन ॥ ४ ॥ ॥
श्लोक ॥ इष्टापूर्तेनमामेवंयोयजेतसमाहितः ॥ लभतेमयिसद्भक्तिंमत्स्मृतिःसाधुसेवया ॥ ४७ ॥ ॥ टीका ॥ करितांनानायोगया
ग ॥ वापीकूपवनतडाग ॥ श्रौतस्मार्तेवनचांग ॥ मदर्पणसांगजिहींकेलें ॥ ५ ॥ श्रौतअग्निहोत्रसोमयाग ॥ स्मार्तवापीकूपतडाग ॥
भजनार्पितांदोन्हीव्यंग ॥ सत्कर्मसांगमदर्पणें ॥ ६ ॥ कर्मकरितांमदर्पण ॥ अवचट फळवांछीमन ॥ इतुकियासाठींभक्तासिविघ्न
॥ सर्पथाजाणयेवोनेदीं ॥ ७ ॥ सकामकर्मकर्त्यांसी ॥ जेमाभिनव्हे अतिप्रयासी ॥ त्याउत्तमलोकगतिभोगासी ॥ मद्भक्तासिमीदे
ता ॥ ८ ॥ पोटातुनीमाझाभक्त ॥ दिव्यभोगासी होयविरक्त ॥ नेभोगभोगितांमातेंस्मरत ॥ भोगासक्तनोनव्हे ॥ ९ ॥ साधूदेवालयाजा
तां ॥ पर्जन्येंपीडिलेंधारावर्ता ॥ तोवेश्यागृहासीनेणतां ॥ आला अवचितावोसरिया ॥ १० ॥ तोवसोनिवेश्येसीनातळे ॥ तेंविभक्तदि
व्यभोगासीकंटाळे ॥ ठकलोंम्हणेअनुतापबळें ॥ पिटूनिकपाळेंहरिस्मरे ॥ ११ ॥ ऐशियाअनुतापस्थिती ॥ तत्काळभोगक्षयाजाती ॥
तोजन्मपावेमहामती ॥ माझीभक्तीजियेगृहीं ॥ १२ ॥ त्यासिपूर्वसंस्कारस्थिती ॥ सकळविषयांचीविरक्ती ॥ उपजतचिलागेभ
क्तिपंथी ॥ भक्तआवडतीजिवेंप्राणें ॥ १३ ॥ तोमुक्तीतेंह्मणोनिल्मने ॥ निजसर्वस्वेंभजेमातें ॥ यापरीनिजभक्तातें ॥ तेंदीविभातेंआ

नकूं ॥१४॥ यापरीज्यासविषयविरक्ती ॥ तेहीइष्टपूर्तजेंकरिती ॥ योगयागसाधिती ॥ माझीभक्तीतेंउपजे ॥१५॥ समाहितकरोनिमन
॥ श्रौतस्मार्तकर्मानुष्ठान ॥ योगयागत्यागसाधन ॥ निष्टेनेंजाणतेंकरिती ॥ १६॥ तेणेंशुद्धहोयचित्तवृत्ती ॥ झालीचित्स्वरूपाचीप्रा
प्ती ॥ तैंउपजेमाझीसद्भक्ती ॥ जाणनिश्चितीउद्धवा ॥ १७॥ इतुकीनकरितांआटाटी ॥ माझेभक्तचीहोयभेटी ॥ हेंअतिगुह्यआहेमा
झेपोटीं ॥ तेंतुजमीगोठीसांगेन ॥१८॥ सांडोनिसकळसाधन ॥ जोकरीसाधुभजन ॥ तेह्यांचित्त्यानेंशुद्धमन ॥ सत्यजाणउद्धवा ॥१
१९॥ ह्मणसीसाधूतोकैसाकोण ॥ म्यागांसांगीतलेंलक्षण ॥ बहुबोलावयानाहींकारण ॥ साधूतोजाणसद्गुरू ॥ २०॥ त्यासद्गुरूचेंभ-
जन ॥ जोभावार्थेंकरीआपण ॥ सर्वशुद्धीचेंकारण ॥ सद्गुरूजाणसर्वांसी ॥ २१॥ त्याचेमुखींचेंवचन ॥ ब्रह्मसाक्षात्कारापाववी
जाण ॥ त्याचेसेवेवीणआचरण ॥ शुद्धीकोणाहोइना ॥ २२॥ गुरुनामघेतांमुखें ॥ कळीकाळपाहूंनशके ॥ त्याचीसेवाकरितां
हरिखें ॥ पायांमोक्षलागेंलागती ॥ २३॥ त्यासिसद्गुरूचीआवडीचित्तीं ॥ ज्यासिसद्गुरुभजनीमीती ॥ त्यासिभाळलीमाझीभ-
क्ती ॥ पाठिलागेनिश्चितीवरावया ॥ २४॥ जोगुरुभजनीभावार्थी ॥ जेंगामाजीतोचिस्वार्थी ॥ त्यापासींमाझीसद्भक्ती ॥ असेति
ष्ठतपायांतळीं ॥ २५॥ सद्भक्तीबापुडीकाइसी ॥ आंगेंमीहिअहिर्निशी ॥ तिष्ठतसेस्वानंदेंसी ॥ गुरूप्रेमासीभूललों ॥ २६॥ मजमाझ्याभक्ता
चीथोरगोडी ॥ परिगुरुभक्ताचीअतिआवडी ॥ सत्संगेंवीणरोकडी ॥ सद्भक्तीचोरवडीउपजेना ॥ २७॥ ॥श्लोक॥ प्रायेणभक्ति
योगेनसत्संगेनविनोद्धव ॥ नोपायोविद्यतेसध्र्यङ्प्रायणंहिसतामहम् ॥ ॥टीका॥ माझीयेप्राप्तीलागुनी ॥ भक्तिज्ञानमार्गदो-
न्हीं ॥ ज्ञानअत्यंतकठीणपणी ॥ भक्तीनिर्विघ्नेंपाववीमज ॥ २८॥ संसारतरावयालागीं ॥ अनेकसाधनेंअनेगीं ॥ बोलिलोंतेजाणवा
उगीं ॥ उत्तमप्रयोगींमद्भक्ती ॥ २९॥ उपायामाजीअतीप्रांजळ ॥ निर्विघ्नआणीनित्यनिर्मळ ॥ माझीभक्तिमार्गकेवळ ॥ ज्ञानतेंविक
ळमध्यपातीं ॥ ३०॥ मजळाशीपावयालागुनी ॥ मोटपाटउपायदोन्हीं ॥ मोटांकाढिजेविहीरखणीं ॥ बहुतकष्टीनीअर्नअल्प ॥ ३१॥ मो

टनाडाबैलजोडी ॥ अखंड झोडितां आसुडी ॥ येनांजातांवोढावोढी ॥ भोयभिजे थोडी भाग एक ॥ ३२ ॥ तेथहि मोट फुटे कांनाडा तुटे ॥ वोढव पडे बैल अवचटे ॥ तरी हाता येतां पीक आटे ॥ वोलतुटे तत्काळ ॥ ३३ ॥ तेसा न व्हे सरितेचा पाट ॥ येकवेळ केल्या वाट ॥ अहिर्निशी घडघडाट ॥ चालती लोटजीवनाचे ॥ ३४ ॥ मोटेचें पाणी तैसें ज्ञान ॥ करूनि वेद शास्त्र पठण ॥ नित्यानित्य विवेकासी जाण ॥ पंडीत विचक्षण बैसती ॥ ३५ ॥ येक कर्माकडे वोढी ॥ येक संन्यासाकडे वोढी ॥ येक ह्मणती हे गोष्टी कुडी ॥ देहो वोढावोढी न घालावा ॥ ३६ ॥ येक ह्मणती प्रारब्ध प्रमाण ॥ येक ह्मणती सत्य शब्दज्ञान ॥ येक ह्मणती धरावें मौन ॥ अती जल्पन करावा ॥ ३७ ॥ येक ह्मणती सांडा नित्यत्ती ॥ त्याचीच दृढ अधिक युक्ती ॥ तो चिज्ञाना निश्चिती ॥ सांगों किती मूर्खासी ॥ ३८ ॥ येक ह्मणती तप प्रमाण ॥ येक ह्मणती पुरश्चरण ॥ येक ह्मणती वेदाध्ययन ॥ द्यावें दान एक ह्मणती ॥ ३९ ॥ येक तो अवघेंचि मोडी ॥ घाली योगाचि येक उडी ॥ लावी आसन मुद्रेची वोढी ॥ बैसवी रोकडी वारयावरी ॥ ४० ॥ ऐसे नाना वाद करितां ॥ येक निश्चयो न व्हे सर्वथा ॥ ज्ञानाभिमान अती पंडिता ॥ ज्ञान नत्वता कळेना ॥ ४१ ॥ ऐसी ज्ञानमार्गींची गती ॥ नानापरीची विघ्नें येती ॥ विकल्पें नासिल्या वित्पत्ती ॥ मी झोनिजधामासी येथें नाहीं ॥ ४२ ॥ तैसी न व्हे माझी भक्ती ॥ नाममात्रें मज पावती ॥ नामें उद्धरले ते णो किती ॥ हेंचि भागवती बोलिलें ॥ ४३ ॥ माझें करितां गुणवर्णन ॥ कांहरिकथा नामसंकीर्तन ॥ तेथें रिघों न शके विघ्न ॥ गडगर्जनें हरीनामें ॥ ४४ ॥ जेथें हरीनामाचे पवाडे ॥ तेथें विघ्नकैंचें बापुडें ॥ विघ्न पळे सद्भक्ता पुढें ॥ उघडती कवाडें मोक्षाची ॥ ४५ ॥ माझे भक्त अति निराश ॥ न धरिती मोक्षाची आश ॥ यालागीं मी हृषीकेश ॥ त्यांचा भावार्थासि भूललों ॥ ४६ ॥ एवं निर्विघ्न मज माजी सरता ॥ मार्ग नाहीं भक्तीपरता ॥ हें सत्य सत्य गा सर्वथा ॥ भक्ती नलता मज पढीये ॥ ४७ ॥ ऐसी निजभक्ती फलप्रफुडी ॥ देवो सांगे अती आवडी ॥ उद्धवासी हरिभक्तीची गोडी ॥ हर्षाचा गुढी उभारिली तेणें ॥ ४८ ॥ जें उद्धवाच्या जीविहांतें ॥ तेंचि निरोपिलें श्रीअनंतें ॥ हर्षे नाचों लागला तेथें ॥ जंव तें श्रीकृष्णा तें-

वोंगाळी ॥ ४९ ॥ ऐसीतुझीसकळभक्ती ॥ नरिंअवघेचिभक्तिकांनकरिती ॥ दवोह्मणोभाग्येंवीणप्राप्ती ॥ नघडेनिश्चिती उद्धवा ॥ ५० ॥
कोटीजन्माचीपुण्यसंपत्ती ॥ जरीगांठीअसे आइती ॥ तेजोडे माझ्यासंतांचीसंगती ॥ सद्भागेंभक्तीउल्हासे ॥ ५१ ॥ सत्संगेंभ
क्तीचीप्राप्ती ॥ उद्धवाजाणनिश्चिती ॥ संतापासींमाझीभक्ती ॥ वासपाहातीउभी असे ॥ ५२ ॥ हीकांतूंसंतमाझेह्मणसी ॥ येर-
लोकसांडिलेकोणापासीं ॥ तुझीभक्ती अहिर्निशी ॥ संतांपासींकांअसे ॥ ५३ ॥ उद्धवाऐसाविकल्पभावो ॥ येथेंधरावयानाहीं
ठावो ॥ संतभजनीमाझासद्भावो ॥ केवाकोणपाहाहोभक्तीचा ॥ ५४ ॥ संतसेवाकरावयासी ॥ कोणकारणतूंमजह्मणसी ॥
अनावरामजअनंतासी ॥ तिहींनिजभावेंसीआकळीलें ॥ ५५ ॥ मजआकळिलेंज्याहेतू ॥ तेहीसांगेनतुजमातू ॥ मजवांचू
निजगाआंतू ॥ दुसराअर्थेनेणती ॥ ५६ ॥ आपुलेंजेंस्वकर्म ॥ मजअर्पिलेसर्वधर्म ॥ देहगेहेंरूपनाम ॥ आश्रमधर्ममदर्पण ॥
५७ ॥ कल्पांतविजेंकडकडाटें ॥ जेंधाकेंधाकेंविरानआटे ॥ ऐसींवादवल्याअचाटें ॥ मजवेगळेनेंनदळती ॥ ५८ ॥ तुटोनीपड
तांआकाश ॥ अणिकाचीनपाहातीवास ॥ यालागींमीहृषीकेश ॥ त्याचादासमीझालों ॥ ५९ ॥ नव्हेमावायांचामहिमा ॥ म
जविश्वात्म्याचाझालाआत्मा ॥ ऐसेंलाहाणेंतयाआत्मा ॥ मजपुरुषोत्तमावशकेलें ॥ ६० ॥ संतांसीमजभिन्नपण ॥ कल्पांति
हींनाहींजाण ॥ हेंजिव्हारींचीउणखुण ॥ तुजसंपूर्णसांगीतली ॥ ६१ ॥ संतमाझेझाले माझ्याभक्ती ॥ येरलोकमजनभजती ॥ तें
म्यादीधलेंकाळाच्याहातीं ॥ आदृष्टगतीबांधोनी ॥ ६२ ॥ माझियासंतापाशी ॥ यावयाप्रामीनाहींकाळासी ॥ मीसदांसंरक्षिता
त्यासी ॥ तेकळिकाळासीनागवती ॥ ६३ ॥ यापरीसंतांचेंसर्वकाज ॥ करितांमजनाहींलाज ॥ उद्धवामाझें अत्यंतनिजगुज ॥
फोडूनितुजदाविलें ॥ ६४ ॥ ॥ श्लोक ॥ अथैतत्परमंगुह्यंशृण्वतोयदुनंदन ॥ सुगोप्यमपिवक्ष्यामित्वंमेभृत्यःसुहृत्सखा
॥ ४९ ॥ ॥ टीका ॥ एकयदुवंशाकुळटिळका ॥ तूंस्वगोत्रसुहृदभृत्यसखा ॥ तुजनसांगिजेहा आनाका ॥ सर्वथादेखा

नथरवे ॥ ६५ ॥ मजगुह्याचें गुह्य सार ॥ साराचें गुह्य भांडार ॥ तें भांडारीचें निजसार ॥ तुज मी साचार सांगेन ॥ ६६ ॥ ऐसें
गुह्याचें गुह्य निश्चिती ॥ नाहीं सांगीतलें काणाप्रती ॥ तूं सखा जीवलग संगाती ॥ अनन्य प्रीती मज लागीं ॥ ६७ ॥ केवळ को
रडी नव्हे प्रीती ॥ तैसीच माझी अनन्य भक्ती ॥ भक्ती सारिखी विरक्ती ॥ अवंचकस्थिती तुज यासी ॥ ६८ यादवांशीं पाहा
तां देख ॥ मज समान तूं चि येक ॥ समान स्वगोत्र आणि सेवक ॥ हें आलोलिक उद्धवा ॥ ६९ ॥ नव्हेसी कार्यार्थी सेवक ॥ सर्व-
भावें विश्वासक ॥ किती वाणु गुण येकायेक ॥ परम हरीख मज झाला ॥ ७० ॥ यालागीं गुह्य नेहीतु झांगई ॥ वंचावया मज थी
रु नाहि ॥ हृदय आलिंगिलें हृदयीं ॥ चिदानंद पाही तुष्टला ॥ ७१ ॥ म्हणे सावधान ॥ सादर आईक माझें वचन ॥ तुज फा
वल्या माझें गुह्य ज्ञान ॥ वंश उद्धरण तुझेनी ॥ ७२ ॥ जे वंशी होय ब्रह्मज्ञानी ॥ तो वंश पवित्र त्याचेनी ॥ हें सत्य जाण माझी वाणी
॥ विकल्प मनीं न धरावा ॥ ७३ ॥ ह्मणसी स्वयें तूं ब्रह्म पूर्ण ॥ वंशीं अवतार श्रीकृष्ण ॥ तेणें वंश उद्धरण ॥ माझें ज्ञान न तों कीती ॥
७४ ॥ तरी नाम रूप जाती गोत ॥ या अवघ्यांसी मी अलिप्त ॥ सकळ कुळा मी कुळवंत ॥ गोत समस्त मज माझें ॥ ७५ ॥ ऐसें जा
णोनी निज गुह्य सार ॥ तुज मी सांगेन साचार ॥ होईल जगाचा उद्धार ॥ ऐसें सारंगधर बोलिला ॥ ७६ ॥ तें ऐकावया गुह्य
ज्ञान ॥ उद्धवें मनाचे उघडिले कान ॥ सावध पाहातां हरीचें वदन ॥ नयनीं नयन वेचले ॥ ७७ ॥ या परी उद्धव सावधान
॥ त्यासी कृष्ण सांगेल गुह्य ज्ञान ॥ पुढिले अध्याई अती गहन ॥ रमाळ निरोपण हरीचें ॥ ७८ ॥ एका विनवी जनार्दन ॥
श्रोतां व्हावें सावधान ॥ संतीं द्यावें अवधान ॥ मस्तकीं चरण वंदिले ॥ ७९ ॥ तुमचेनि पादप्रसादें ॥ श्रीभागवतींचीं श्लो
कपदें ॥ वाखाणिन अर्थावबोधें ॥ संतस्वानंदें तुष्टलेया ॥ ८० ॥ यालागीं एका शरण जनार्दनीं ॥ तंव जनार्दन चि एकपणीं
॥ जेवि का सागरीचें पाणीं ॥ तरंगपणीं विराजे ॥ ८१ ॥ ॥ इतिश्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकार-

टीकायांश्रीकृष्णउद्धवसंवादे एकादशपूजाविधानयोगोनामएकादशोऽध्यायः ११ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

॥ ॥ गुच्छचवथा अध्याय ११ याचीसंख्या श्लोक ४९ ओव्या १५८१ ॥ मिळून ॥ १६३०

भा॰ श्रीगणेशायनमः॥ ॥ओंनमोसद्गुरूवसंतु॥ऐक्यऋतुकाळेंतुझाऋतु॥नयाऋतुकाळींचामारुतु॥ज्ञानवना
तुजैंरिघे॥१॥तेंअविद्येचींजुनींपानें॥गळूनिजातितत्क्षणें॥नवपल्लवींविराजमानें॥विरक्तपणेंआरक्त॥२॥अत्यंत
वैराग्याचीहांव॥स्वांकुरझालेवृक्षसर्व॥त्यांसिनिघालेनवपल्लव॥अतिलवलवकोंवळिक॥३॥जाहाल्यावसंताचें
रिगवणें॥वृक्षआडवेंफुटलेतेणें॥सोहंभावाचींसुमनें॥तेणेंगुणेंविकाशलीं॥४॥कृष्णसारूप्यकृष्णभ्रमर॥तेथेंझेंपा
वलेअतांसत्वर॥अमोदसेवितांअरुवार॥केंसेनिकेशरकुंचंबे॥५॥सद्भावाच्याअमोदधारा॥सेवितांसुखझालेंभ्रमरा॥
हृदयकमळींकेलाथारा॥मध्यमहूागचालिलें॥६॥भेदोनियांसाहीकमळें॥हृदळादिषोडशदळें॥झेंपावलेमलयानि
ळें॥सहस्रदळींमिसळले॥७॥तेथसेऊनिपरागधवळ॥उन्मत्तमातलेअळिकुळ॥करितांआनंदाचागोंधळ॥सुखकल्लो
ळस्वानंदें॥८॥लागल्याअनुहातध्वनी॥रुणझुणितीदशलक्षणीं॥त्याहिनादातेंप्राशुनी॥निःशब्दपणानिवांत॥९॥तेथें
मोक्षसुखाचेघड॥डोलतांदिसेअतिगोड॥तेणेंजीवाचेंपुरतकोड॥करितांधुमाडसोहंशब्दें॥१०॥मुमुक्षुमयोरअतिमानी
॥पिच्छेंपसरूनिनांचतां॥येऊनवसंतवनाप्रतां॥टाहांफोडितीगुरुनामें॥११॥नेमस्तकोकिळांहोतेंमोन॥वसंतऋतुराजदेखो
न॥तिहींकरोनिविसर्जन॥मधुरस्तघनेंगर्जती॥१२॥भक्तिसरोवरींनिर्मळपाणी॥विकाशल्यानवविधकमळणी॥भक्तस
स्नाततियेस्थानी॥निमज्जनींनिश्चळ॥१३॥तेसरोवरींचेंसेवितांपाणी॥जीवशिवचक्रवाकेंदोनी॥सद्गुरुचिद्भानुवसंतवनी
॥देखोनिमिळणीमेळाली॥१४॥वसंतेंउल्हासतरुवरा॥उलोनिलागल्यास्वानंदधारा॥पारंब्याभेदुनियांधरा॥धराधारावितु
तल्या॥१५॥बोधमलयानीळझळकत॥तेणेंवनश्रीमघमघित॥मोक्षमार्गींचेपाथिकतेथ॥निजींनिजतनिजरूपें॥१६॥ऐसा
सद्गुरुवसंतरावो॥निजभक्तवनादेउत्सावो॥तोभागवतभजनअध्यावो॥उद्धवासीदेवोसांगत॥१७॥बाराकेअध्यायींनिरूपण

सत्संगाचामहिमागहन॥ कर्माचाकर्तातेथकोण॥ त्यागितेंलक्षणकर्माचें॥१८॥ संपतांअकरावाअध्यावो॥गुत्द्यसांगेनह्मणे
देवो॥ तेंपरिसावयाउद्धवो॥त्याह्वाळीपाहाहाहारिवदन॥१९॥ कायसांगेलगुत्ह्यगोष्टी॥कोणअक्षरेंनिघतीवोठां॥ त्यावचनार्थी
घालावयामिठी॥उल्हासपोटींउद्धवा॥२०॥जैसेंमेघमुखींचेंउदक॥ वरचावरीझेलीचातक॥तैसेंकृष्णवचनालागिंदेख॥प
सरीमुखउद्धवु॥२१॥स्नानसंध्याभोजन॥करावयाएकेकाळेंजाण॥तैसेंज्ञेयज्ञाताज्ञान॥घ्यावयासावधानउद्धव॥२२॥ऐसाउ
द्धवाचाआदरु॥देखोनिहरीझालासादरु॥भक्तकृपाळूअतीउदारु॥निजगुत्ह्यसारुसांगत॥२३॥ ॥श्लोक॥श्रीभगवानुवाच
॥ ॥नरोधयतिमांयोगोनसांख्यंधर्मएवच॥नस्वाध्यायस्तपस्त्यागोनेष्टापूर्त्तंनदक्षिणा॥१॥ ॥टीका॥ ॥मजवश्यकराव
यालागीं॥सामर्थ्यनाहींअष्टांगयोगीं॥नित्यानित्यविवेकजगीं॥गांवोगावींमजनपवे॥२४॥प्रकृतीपुरुषविवेचना॥अखंड
आलोडितांमना॥पावावयामाझियास्थाना॥सामर्थ्यजाणत्यानाहीं॥२५॥धर्मअहिंसादिसमस्त॥सत्यातेंमीनव्हेप्राप्त॥मुख्य
वेदाध्ययनेंहिमीअप्राप्त॥सांगसमस्तजऱ्हींपढिले॥२६॥तेथतपेंकायसीबापुडीं॥पंचाग्निअसारपरवडी॥कृच्छ्रचांद्रायणें
झालींवेडीं॥त्यांचेजोडीमीनजोडें॥२७॥देहगेहसांडूनिउदास॥विरजाहोमीहवीसर्वस्व॥साधनीअतिश्रेष्ठसन्यास॥त्यासि
मीपरेशनातुडें॥२८॥करितांश्रौतस्मार्त्तकर्मासी॥कर्मेंदेंझालींपानपिसीं॥तरीमीनाकळेत्यासी॥कुशहोमेंसीकष्टतां॥२९॥
गोदानभूदानतिलदान॥दानदेतांधनधान्य॥त्यासिमीनाटोपेंजाण॥दानाभिमाननवचतां॥३०॥संकटचतुर्थीऋषिपंचमी
॥विष्णुपंचकबुधाष्टमी॥अनेकव्रतेंकरितांनेमीं॥मीतेकर्मीनातुडें॥३१॥अश्वमेधराजसूयाग॥सर्वस्ववेचूनिकरितांचां
ग॥माझीप्राप्तीनव्हेचिसांग॥तेणेंमीश्रीरंगतातुडें॥३२॥होकांवापीकूपआराम॥वृक्षरोपणेंमनविश्राम॥आचरतांस्मा
र्तकर्म॥मीआत्मारामनभेटें॥३३॥नानाछंदरहस्यमंत्र॥विधिविधानेंअतीविचित्र॥सामर्थ्येंअतीविशेषपवित्र॥नव्हती

स्वतंत्रमस्वामी ॥ ३४ ॥ पुष्करादि नानातीर्थें ॥ पापनिर्दळणीं अतिसमर्थें ॥ शीघ्र पावावया मातें ॥ सामर्थ्य त्यांतें असेना ॥ ३५ ॥ यम
नियम अहर्निशीं ॥ जे सदा शिणती साधनेंसीं ॥ ते यावया माझ्या द्वारासी ॥ सामर्थ्य त्यासि असेना ॥ ३६ ॥ उद्धवा यम नियम निर्धा
र ॥ एकुणिसावे अध्यायीं सविस्तर ॥ तुज म्यां सांगेन साचार ॥ साक्षपाकार बारावा ॥ ३७ ॥ ते यम नियम बारा बारा ॥ आणि सकळ
साधनसंभारा ॥ या वया माझिया नगरा ॥ मार्ग पुढारा चालेना ॥ ३८ ॥ ते गेलिया संताच्या दारा ॥ धरूनि साधूंचा आधारा ॥ अवघीं
आलीं माझ्या घरा ॥ एवं परंपरा मस्वामी ॥ ३९ ॥ तें शीन व्हे सत्संगती ॥ संग सकळ संगा तें छेदिती ॥ ठाकठोक माझी प्राप्ती ॥ पं भक्ति
करिती आणिका ॥ ४० ॥ किटि भिंगुरटीचा संगती ॥ पालटे स्वदेहस्थिती ॥ ते विंधरिलिया संतांची संगती ॥ भक्त पालटती मद्रूपता
॥ ४१ ॥ केवळ पाहे पां जड सुंदे ॥ चंदनास भोंवतीं झाडें ॥ तें सुगंध होऊनि लोकडें ॥ मोलगा देंपावलीं ॥ ४२ ॥ तें अचेतन झाड सर्वथा
॥ चढलें देव ब्राह्मणाचे माथां ॥ त्याचा पांग पडे श्रीमंता ॥ राजे तत्वता वंदिती ॥ ४३ ॥ तेशीं धरिल्या सत्संगती ॥ भक्त माझी पदवी
पावती ॥ शेरवींम जहीं पूज्य होती ॥ सांगों किती महिमान ॥ ४४ ॥ संतसंगती वेगळें जाण ॥ तत्काळ पावावया माझें स्थान ॥ आ
णिक नाहीं च साधन ॥ सत्य जाण उद्धवा ॥ ४५ ॥ मागां बोलिलें लाजें साधनें ॥ तीं अवघीं हि मलीन अभिमानें ॥ ऐकत यांचीं लक्षणें
॥ तुज कारणें सांगेन ॥ ४६ ॥ अष्टांगयोगीं दुर्जयो पवन ॥ सर्वथा साधेना जाण ॥ साधलां तरी भागवण ॥ अनिवार जाण सिद्धी
ची ॥ ४७ ॥ नित्यानित्यविवेक ज्ञान ॥ तेथें बाधी पंडिताअभिमान ॥ प्रबळ वांछी धनमान ॥ ज्ञान चिविघ्न ज्ञात्यासी ॥ ४८ ॥ अ
हिंसा धर्म करितां जनीं ॥ धर्मिष्टपणीं गाळिती पाणी ॥ गाळितां निमाल्या जीव श्रेणी ॥ अधर्मपणी तो धर्म ॥ ४९ ॥ करितां वेद
अयन ॥ मुख्य देवें धरिलें मौन ॥ पठणमात्रें मीना तुडें जाण ॥ याजन दान वांछितां ही ॥ ५० ॥ तप करूं जातां देहीं ॥ क्रोध ताप
साच्या ताथीं ॥ परता जावों ने दि काही ॥ वाटला पाहीं नाचनवा ॥ ५१ ॥ सर्वस्व त्यातें संन्यासग्रहण ॥ तेथ हि निजळे देहाभिमा

न॥ व्यर्थ विरजा होमगेला जाण॥ मानाभिमान बाधिती॥५२॥ श्रौतस्मार्त कर्म सांग॥ इष्टापूर्त जें कां याग॥ तेथ आडवाठां के
स्वर्गभोग॥ कर्मक्षयरोग साधकां॥५३॥ नाना दानें देतां सकळ॥ वासना वांछी दानफळ॥ कां दातेपणें गर्व प्रबळ॥ लागला अद
ळ दळेना॥५४॥ अनंतव्रतें व्रती झाला॥ चौदा गांठी देव बांधला॥ शेखीं अनंता तें विसरला॥ देवो हारविला हातींचा॥५५॥ ना-
ना यज्ञ करितां विधी॥ मंत्र तंत्र पात्रशुद्धी॥ सहसा पावों न शके सिद्धी॥ पावल्या बाधी फळभोग॥५६॥ नाना छंद रहस्य मंत्र॥ वि
कळ होंनये उच्चार॥ मंत्रीं मंत्र रचिले साचार॥ चळले अपार मंत्रवादी॥५७॥ भगवीं करूनि तां बडीं॥ तीर्थाभिमानें कापडी॥
भिके लागली बापुडीं॥ नाहीं अर्धघडी विश्रांती॥५८॥ यमनियम बारबारा॥ करितां अखंड घोर बारा॥ चौथिसां माजी यां चाउ
भारा॥ नेणती सायरा पंचविसावा॥५९॥ एवं सांगीतल्या साधनासी॥ आपमतीं करितां त्यासी॥ बाधकता आहे सर्वांसी॥ ते
म्या तुज पासीं सांगीतली॥६०॥ करितां साधनें आपमतीसी॥ तेथें विघ्नें उपजती ऐशीं॥ तींच साधनें साधुउपदेशीं॥ सर्वही सि
द्धीस पावती॥६१॥ साधुनसांग तोनिर्धारीं॥ नाना साधनें हा काय करी॥ कोण विधान कैशी परी॥ निज निर्धारीं कळेना॥६२॥
न करितां साधनविस्तार्ता॥ केवळ जाण सत्संगती॥ मज पावले नेणों किती॥ तें मी तुजप्रती सांगेन॥६३॥ ॥श्लोक॥ ॥व्र
तानि यज्ञश्छंदांसि तीर्थानि नियमा यमाः॥ यथावरुंधे सत्संगः सर्वसंगापहो हि माम्॥२॥ सत्संगेन हि दैतेया यातुधाना मृगाः
खगाः॥ गंधर्वाप्सरसो नागाः सिद्धाश्चारणगुह्यकाः॥३॥ विद्याधरा मनुष्येषु वैश्याः शूद्राः स्त्रियोंऽत्यजाः॥ रजस्तमःप्रकृतयस्त
स्मिंस्तस्मिन्युगेऽनघ॥४॥ ॥टीका॥ ॥पाहातां केवळ जडमूढ॥ रजतमयोनीं जन्मले गूढ॥ सत्संगतीलागोनि दृढ॥ मा
तें सदृढ पावले॥६४॥ दैत्य दानव निशाचर॥ खग मृग गंधर्व अप्सर॥ सिद्ध चारण विद्याधर॥ नाग विखार गुह्यक॥६५॥ खग
मृग सर्प पावले मातें॥ मानव तंव सहजें सरतें॥ वैश्य शूद्र स्त्रियादि समस्तें॥ पावले मातें सत्संगें॥६६॥ जे सकळ वर्णधर्मा

वेगळे॥ ज्यांच्या माचारी कोणी नातळे॥ छाया देखूनि जग पळे॥ अत्यंत मैळे अंत्यज॥ ६७॥ तिहीं धरोनि सत्संगती॥ आले माझि
या पदाप्रती॥ देव द्विज मातें वंदिती॥ अभिनव कीर्ति संतांची॥ ६८॥ धरिलिया सत्संगती॥ निंद्य तेही वंद्य होती॥ उद्धवा तूं निःपाप
निश्चितीं॥ तरी सत्संगती करावी॥ ६९॥ सोनें साडेपंधरेंचोखडें॥ त्या मिळाल्या संगती जोडे॥ तें अधिकाधिक मोल चढे॥ मुकु
टीं चढे महेंद्रा॥ ७०॥ तैशी पुण्यपुरुषा सत्संगती॥ जाहल्या अनंत सुख पावती॥ सुरवर त्यातें वंदिती॥ शिवादि येती भेटीसी॥
७१॥ यमधर्म पायां लागती॥ तीर्थें पाय वंदूं मागती॥ भावें धरिल्या सत्संगती॥ ऐवढा माग पुरुषासी॥ ७२॥ दैत्य राक्षस स्त्री
शूद्र पाहीं॥ अंत्यज तरले ब्राह्मणसी काई॥ त्या त्या युगाचा तें तें दावीं॥ बहुसाल पाहीं उद्धरिले॥ ७३॥ ॥श्लोक॥ ॥बहवो मत्प
दं प्राप्तास्त्वाष्ट्रकायाधवादयः॥ वृषपर्वा बलिर्बाणो मयश्चाथ विभीषणः॥ ५॥ सुग्रीवो हनुमानृक्षो गजो गृध्रो वणिक्पथः॥
व्याधः कुब्जा व्रजे गोप्यो यज्ञपत्न्यस्तथापरे॥ ६॥ ॥टीका॥ ॥वृत्रासुर गाइजे वेदीं॥ जो इंद्रासि पिसे घाला युद्धीं॥ युद्धीं हि
अविरुद्ध बुद्धी॥ माझें निजपद पावला॥ ७४॥ एक तो नारदाच्या गोष्टी॥ गर्भींच मज सीं घातली मिठी॥ जो जन्मला कयाधूचा
पोटीं॥ भक्त जगजेठी प्रल्हाद॥ ७५॥ वृषपर्वा दैत्य अद्‍दु॥ माझें पद झाला प्रविष्टु॥ बळीचा द्वारीं मी स्वयें जड॥ झालों बटु भिकेसी
॥ ७६॥ छळें करितां बळी बंधन॥ छळितां मी छळिलों जाण॥ अंगा आलें द्वारपाळपण॥ बळी आधीन मी झालों॥ ७७॥ त्या बळी
चा पुत्र बाणासुर॥ शिववरदें मातला थोर॥ माझ्या पुत्राचा चोरिला पुत्र॥ दोहींचा वैर नारदु॥ ७८॥ तो म्यां साधूनि धरिला चोरु॥
बाण केला अति जर्जरु॥ छेदिला सहस्रभुजांचा भारु॥ शिवजीवें मारूं नेदीच॥ ७९॥ तो म्हणे भक्त पुत्र स्वयें मारी॥ मज जाहले बळी
ची भीड भारी॥ अखंड मी असें त्याचा द्वारीं॥ या लागीं उद्धरी बाणातें॥ ८०॥ मग संबोखवा वयाशि वातें॥ बाण आपुलेनि जहस्तें॥
ऐकें शिवपदीं स्थापिलें त्यातें॥ कल्याणातें पावला॥ ८१॥ खांडवयन अग्नीमी॥ अर्जुनें तो धरिल्या वयासं॥ तेणें नय तो मा

करासी ॥ त्याचि तयासी उद्धरिलें ॥ ८२ ॥ राक्षसकुळीं जन्मला जाण ॥ शत्रूचा बंधु बिभीषण ॥ माझ्या ठायीं अनन्यशरण ॥ जीवप्रा
णें तो माझा ॥ ८३ ॥ सुग्रीव हनुमंत जांबुवंतु ॥ यांचा पवाडा विख्यातु ॥ जटायु उद्धरिला वनांतु ॥ जो रावणें खस्त केला होता ॥ ८४
॥ गजसरोवरीं ग्रहग्रस्त ॥ स्त्रियापुत्रीं सांडिला जीत ॥ तो अंतकाळीं मातें स्मरत ॥ आर्तभूत अनिस्वरें ॥ ८५ ॥ सांडूनि समस्तांची
आस ॥ पाहोनि वैकुंठाचा वास ॥ राजीव उचलूनि राजस ॥ पाव परेश ह्मणे वेगीं ॥ ८६ ॥ त्या गजेंद्राचे तांतडी ॥ वैकुंठीं होनिल वड
सवडी ॥ त्या गरुडापुढें घालोनि उडी ॥ बंधन तोडी गजाचें ॥ ८७ ॥ त्यासि पशुयोनीं जन्म होतें ॥ परी तो अंतीं स्मरला मातें ॥ पावला
माझ्या निजधामातें ॥ गाइजे त्यांतें पुराणीं ॥ ८८ ॥ वैश्य तुळाधार वाणी ॥ सत्यवा वा सत्य जोरवणीं ॥ सत्यें पावला मज लागुनी ॥ स
त्य तोलणी त्याचें नाव ॥ ८९ ॥ अंत्यजामाजी धर्मव्याध ॥ माझें पावला निजपद ॥ जराव्याध गा प्रसिद्ध ॥ करोनि अपराध उद्धरिला
॥ ९० ॥ चरणीं बांधोनियां बाण ॥ घायें घेतला माझा प्राण ॥ तो जराव्याध जाण ॥ कृष्णें आपण तारिला ॥ ९१ ॥ कौळिकामाजी गुह्य
क देख ॥ आला श्रीरामासन्मुख ॥ कर्म निरसलें निःशेख ॥ निजधाम देख पावला ॥ ९२ ॥ कुबजा तीं ठायींचा कुडी ॥ नीट निजभावें-
ग्रोरवडी ॥ तिच्या चंदनाची शुद्ध गोडी ॥ अती आवडी मज लागीं ॥ ९३ ॥ तिणें चर्चूनियां चंदन ॥ मन केलें मदर्पण ॥ मी झालों तिज
आधीन ॥ निजधाम ते जाण पावली ॥ ९४ ॥ गोकुळींचिया गोपिका ॥ संसारासि होऊनि विमुखा ॥ तन मन प्राण मज लागीं देखा
॥ भावें निजसुखा पावल्या ॥ ९५ ॥ माझी गोपिकांसी परम आवडी ॥ कीं मज चि गोपिकांची गोडी ॥ पाहातां याचे समान पाडी
॥ जाहाली बापुडीं साधनें ॥ ९६ ॥ सांडूनि संसाराची चाड ॥ न धरूनि पित्यापुत्राची भीड ॥ यज्ञपत्न्यांसि माझें कोड ॥ भावार्थ दृढ भा
विकां ॥ ९७ ॥ तिहीं मज अर्पोनियां अन्न ॥ माझें निजधाम पावल्या जाण ॥ मज न पवती च ते ब्राह्मण ॥ ज्यांसि कर्माभिमान कर्माचा
॥ ९८ ॥ एक ब्राह्मण अतिशास्त्रबळें ॥ पत्नीसि येवुं नेदी मज जवळें ॥ तुह्मी वेदशास्त्रा हि वेगळे ॥ गोरक्ष गोंवळे केविं पूजा ॥ ९९ ॥ येरी

समस्ताजातांदेखोन॥तिचेंमजलागींतळमळीमन॥अतिकर्मठतोब्राह्मणकठिण॥अवरोधूनराखिली॥१००॥पित्यानेंला-
विलीसमाझाहातीं॥तेव्हांचमीतुझादेहाचापती॥मजसांडूनिकेउतीं॥गोकुळाप्रतिजाल्येसी॥१॥येरिह्मणेतूंयादेहाचापती॥
॥तोदेहठेऊनियांतयाप्रती॥जीवित्वेंमीनलेयामजप्रती॥सायुज्यमुक्तीपावली॥२॥ज्यामाझियाप्राप्तीसी॥साधकशिणतीनाना
नासायासीं॥तींसाधनेंनकरितांत्यासी॥अनायासींमजपावल्या॥३॥ ॥श्लोक॥ ॥तेनाधीतश्रुतिगणानोपासितमहत्त
माः॥अव्रतातप्ततपसःसत्संगान्मामुपागताः॥७॥ ॥टीका॥ ॥तिहींनाहींकेलेंवेदपठण॥नाहींगुरूकेलेकेवळशास्त्रज्ञ
॥व्रततपादिनानासाधन॥नाहींजाणतिहींकेलें॥४॥केवळगासत्संगतीं॥मजपावल्यानेणोकिती॥एकभावेंजेभावार्थी॥
त्यासीमीश्रीपतीसुलभ॥५॥ ॥श्लोक॥ ॥केवलेनहिभावेनगोप्योगावोनगामृगाः॥येऽन्येमूढधियोनागाःसिद्धामामीयु
रंजसा॥८॥ ॥टीका॥ ॥केवळस्वरूपजेसंत॥त्यामाझीसंगतीझालीप्राप्त॥कायकरिसीतपव्रत॥भावार्थेंप्राप्तमजजा
लिया॥६॥होवियामाझेंपदप्राप्त॥त्यांसिभांडवलगाभावार्थ॥भावबळेंगासमस्त॥पदनिश्चितपावल्या॥७॥ऐकोनमाझें
वेणुगीत॥गोपिकासांडूनिसमस्त॥निजदेहातेंनसांभाळित॥मजगिवसीतपावल्या॥८॥सांडूनिपतिपित्याचाचाड॥नधरि
तोनिवेदशास्त्राचीभीड॥माझेठायींनिजभावदृढ॥प्रेमअतिगोडगोपिका॥९॥पुत्रस्नेहतोडूनियायें॥विधीतेंरगडूनिपायें
॥माझेआवडीचेनिलवलाहें॥गोपिकामजपाहेंपावल्या॥१०॥त्याचपरीजाणगाई॥वेणुध्वनीवेधल्यापाहीं॥व्याघ्रभयविस
रल्यादेहीं॥माझाठायींविनटल्या॥११॥माझ्यावेणुध्वनीवेधलेंमन॥वत्सेंविसरलींस्तनपान॥मुखींचाकवळमुखींजाण॥
माझेंध्यानलागलें॥१२॥माझावेणुश्रवणासक्तवजिहीं॥निजवैरसांडूनिदेहीं॥येरयेरांवरीमानापाहीं॥व्याघ्रहरिणेंतोंहिवि
सरलीं॥१३॥म्याउपडिलेविमलअर्जुन॥तेतरलेहेंनवलकोण॥वृंदावनींचेवृक्षतृण॥माझ्यासांनिधेंजाणउद्धरिले॥१४॥

मयूरतरलेमोरविसी ॥ गुल्मलतातृणपाषाणासी ॥ जडमूढवृंदावनवासी ॥ मत्संनिधेंत्यासिउद्धारू ॥ १५ ॥ माझ्या संगतीअन
न्यप्रीती ॥ तेंचित्यांस शुद्धभक्ती ॥ तेणेंकृतकृत्यहोऊनिनिश्चिती ॥ माझीनिजप्राप्तीपावले ॥ १६ ॥ माझेनिचरणघातेंसाचार ॥
कालितरलादुराचार ॥ नागनागिणीसपरिवार ॥ माझेनविरवारउद्धरले ॥ १७ ॥ आपुलीजेनिजपदप्राप्ती ॥ तेसत्संगेंविणनि-
श्चिती ॥ दुर्लभहेंउद्धवाप्रती ॥ स्वयेंश्रीपतीसांगत ॥ १८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ येनयोगेनसांख्येनदानव्रततपोऽध्वरैः ॥ व्याख्यास्व
ध्यायसंन्यासैःप्राप्नुयाद्यत्नवानपि ॥ ९ ॥ ॥ टीका ॥ ॥ योगयागव्रतदान ॥ वेदाध्ययनव्याख्यान ॥ तपतीर्थज्ञानध्यान ॥ स
न्यासग्रहणसादरें ॥ १९ ॥ इत्यादिनानासाधनें ॥ निष्ठाकरितांनिर्बंधनें ॥ माझीप्राप्तीदुरासदतेनें ॥ जीवेंप्राणेंनपविजे ॥ २० ॥
यापरीशिणतांसाधनेसी ॥ माझीप्राप्तीनव्हेअतिप्रयासी ॥ तेगोपीपावल्याअप्रयासीं ॥ सत्संगासीलाहोनी ॥ २१ ॥ त्यागोपिकां
सिमाझीप्राप्ती ॥ मीचित्यांचीसत्संगती ॥ सत्संगेंनिजपदप्राप्ती ॥ जाणनिश्चितीउद्धवा ॥ २२ ॥ गोपिकांचीसप्रेमस्थिती ॥ तेतुज
गोकुळींझालीप्रतीति ॥ तुजहीनतर्केचत्यांचीप्राप्ती ॥ तेंमीतुजप्रतीसांगेन ॥ २३ ॥ गोपिकांचेंअत्यंतप्रेम ॥ स्वमुखेंसांगेपुरुषोत्त
मं ॥ उद्धवाचेंभाग्यउत्तम ॥ आवडीनेंवर्मदेवोसांगे ॥ २४ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ रामेणसार्द्धंमथुरांप्रणीतेश्वाफल्किनामय्यनुरक्त
चित्ताः ॥ विगाढभावेननमेवियोगतीव्राधयोऽन्यंददृशुःसुखाय ॥ १० ॥ ॥ टीका ॥ ॥ बळिभद्रासमवेततत्वतां ॥ अक्रुरेंम
जमथुरेनेतां ॥ तैंगोपिकांसीजेझालीव्यथा ॥ तेसांगतांमजनये ॥ २५ ॥ तेत्यांचीअवस्थासांगतां ॥ मजअद्यापिधीरनधरवेचित्त
॥ ऐसेंदेवोसांगतसांगतां ॥ कंठींबाष्पतादाटली ॥ २६ ॥ सांगतांभक्तांचेंनिजप्रेम ॥ प्रेमेंद्रवलापुरुषोत्तम ॥ जोभक्तकामकल्पद्रुम
॥ कृपानिरूपमभक्तांची ॥ २७ ॥ मजमथुरेसजातांदेखोनी ॥ आंसुवांचापूरनयनीं ॥ हृदयफुटेमजलागुनी ॥ प्रेमेंलाळणीघात
ली ॥ २८ ॥ पोटांतीलप्रेमप्रीती ॥ सारितांमागेंनसरती ॥ धरिलेचरणनसोडिती ॥ येतीकाकूलतीमजलागीं ॥ २९ ॥ नवलभा

वार्थत्याचापोटीं ॥ माझ्यारूपींघातलीमिठी ॥ सोडवितांनसुटेगांठी ॥ श्वासपोटींपरतेना ॥ ३० ॥ लाजविरल्यासर्वथा ॥ सासुराप
तिपित्यादेखतां ॥ माझेचरणींठेऊनिमाथा ॥ रडतीदीर्घताआक्रंदें ॥ ३१ ॥ मजर्याणअवघेदेखतीयोम ॥ माझींचपुनःपुन्हापाहातीं
वास ॥ थोरघोलोनिश्वासोश्वास ॥ उकसाबुकसींस्फुंदत ॥ ३२ ॥ आमुचाजिवलगसांगाती ॥ घेऊनिजातोहादुष्टमूर्ती ॥ अक्रुरा-
सन्मुखशिव्यादेती ॥ येतीकाकुलतीमजलागीं ॥ ३३ ॥ उभ्याठांकोनिसन्मुख ॥ माझेंपाहातीश्रीमुख ॥ आठवेवियोगाचेंदुःख ॥ ते
णेंअधोमुखविलपती ॥ ३४ ॥ ऐशियामजलागींआसक्त ॥ माझ्याठायींअनन्यचित्त ॥ विसरल्यादेहसमस्त ॥ अतिअनुरक्तमन
जलागीं ॥ ३५ ॥ माझेनिवियोगेंतत्वता ॥ त्यांसीमाझीतीव्रव्यथा ॥ तेव्यथेचीअवस्था ॥ बोलोंसांगतांमजनये ॥ ३६ ॥ मजवेगळे
जेंजेंसुख ॥ तेंगोपिकांसीकेवळदुःख ॥ कैशीआवडीअलौलिक ॥ मजहृदयींदेखनविसंबती ॥ ३७ ॥ मजगोकुळींअसतां ॥ मा
झेठायींआसक्तचित्ता ॥ तेआसक्तीचीसमूळकथा ॥ ऐकआतांसांगेन ॥ ३८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ तास्ताः क्षपाः प्रेष्ठतमेननीतामये
ववृंदावनगोचरेण ॥ क्षणार्द्धवत्ताःपुनरंगतासांहीनामयाकल्पसमाबभूवुः ॥ ११ ॥ ॥ टीका ॥ ॥ नवलगोपिकांचाहरिख
॥ मजवृंदावनाजातांदेख ॥ माझेंपाहोनिश्रीमुख ॥ प्रातःकाळींसुखभोगिती ॥ ३९ ॥ गाईपाजोनियांपाणी ॥ गोठणीबैसवीं मा
ध्यान्हीं ॥ तेथेंउदकमिसेंगौळणी ॥ पाहायालागूनिमजयेती ॥ ४० ॥ तेथेंनानाकौतुकें नानालीला ॥ नानापरीच्याखेळताखेळा
॥ तोतोदेखोनिसोहाळा ॥ सुखेंवेल्हाळासुखावती ॥ ४१ ॥ मजसायंकाळींयेतांदेखोनी ॥ आरत्यानिंबलोणघेउनी ॥ सामोऱ्या
येतिधांवोनी ॥ लागतीचरणींस्वानंदें ॥ ४२ ॥ माझीगोपिकांसिआवडी ॥ कींगोपिकांचीमजगोडी ॥ पाहातांयाचीसमानपा
डी ॥ झालीबापुडींसाधनें ॥ ४३ ॥ सांडूनिसंसाराचीचाड ॥ नधरोनिपतिपुत्रांचीभीड ॥ माझेठायींनिजभावदृढ ॥ प्रेमगोडगोपि
कां ॥ ४४ ॥ ऐशीत्रिकाळदर्शनेंघेतां ॥ धणीनपुरेत्यांचेचित्ता ॥ त्याहिवरीवर्तलीकथा ॥ एकांतताअतिगुह्य ॥ ४५ ॥ त्यागह्याचें

निजगुज॥ उद्धवामी सांगेन तुज॥ महासुखाचें सुखभोज॥ मी अधोक्षजनाचनला॥ ४६॥ तसुखगोपिका जाणती॥ कामाझी मी जाणें श्रीपती॥ जे रासक्रीडेचा राती॥ झाली सुखप्राप्ती सफळिकांसी॥ ४७॥ त्यासुखाची सुखगोडी॥ रमा काय जाणें बापुडी॥ ब्रह्मादिदेवें केवळ वेडीं॥ त्यासुखाची गोडी नेणती॥ ४८॥ पावावया त्यासुखासी॥ सदाशिव झाला योगाभ्यासी॥ तरी प्राप्तिन व्हे तयासि॥ भुलला मोहनीसी देखतां॥ ४९॥ उमा होऊनि भिल्लटी॥ तेणें भुलविला धूर्जटी॥ त्यासुखाची हातवटी॥ नेणती हृद्यीं तापसी॥ ५०॥ जवळी असोनि निश्चिती॥ संकर्षण महामूर्ती॥ त्यासी त्यासुखाची प्राप्ती॥ नव्हे निश्चिती उद्धवा॥ ५१॥ रासक्रीडा गोपिकापती॥ कोणी ह्मणेल कामासक्ती॥ तेथ कामाची कैंची प्राप्ती॥ ऐक निश्चिती उद्धवा॥ ५२॥ शिवानें जिणोनि फुडा॥ काम ह्मणे मी सबळगाढा॥ माझी भेदावया रासक्रीडा॥ धाऊनि मेढा चालिला॥ ५३॥ तेथ माझ्या स्वरूपाचें वोडण॥ तेथ न चले कामाचें कामपण॥ मोडले मदनाचे बाण॥ दृढ वोडण स्मरणाचें॥ ५४॥ काम कामिकांच पळ दृष्टी॥ निजबोधाची तीक्ष्ण बाणाटी॥ संधिसाधूनि विंधे हटी॥ तें न व्हे चिपेटी हरिरंगीं॥ ५५॥ जेथ क्रीडे आत्मारामु॥ तेथ के विरिये बापुडा कामु॥ माझें कामें गोपिका निष्कामु॥ कामसंभ्रमु त्यां नाहीं॥ ५६॥ जो कोणी स्मरे माझें नामु॥ तिकडे पाहूं न शके कामू॥ जेथ मी रमें पुरुषोत्तमु॥ तेथ कामु कर्मसरेना॥ ५७॥ कामु ह्मणे कटकटा॥ अभाग्य भाग्यें झालों मोटा॥ रासक्रीडेचिया शेवटीं लगोटा॥ आजि मी करंटा न पवेची॥ ५८॥ देखोनि रासक्रीडा गोमटी॥ काम घटघटां लाळ घोंटी॥ लाज सांडूनि जन्मला पोटीं॥ त्यासुखाचे भेटी लागोनी॥ ५९॥ तो काम मन्मथ आपुले अंकीं॥ केला निजभावें निजसुखी॥ तें माझें निजसुख गोपिकीं॥ रासमिसें कीं भोगिलें॥ ६०॥ ते रासक्रीडेची राती॥ ब्रह्मयाच्या षण्मास केलि होती॥ गोपिका अर्धक्षण मानिती॥ वेगीं कां गभस्ती उगवला॥ ६१॥ जेथ माझी क्रीडा सुखकल्लोळ॥ तेथ कोण स्मरे काळवेळ॥ गोपिकांचें भाग्य प्रबळ॥ माझें सुख केवळ पावल्या॥ ६२॥ ऐशा माझिया संगती॥ भोगिल्या राती ने

गोकुळीं ॥ तरीत्यांसिनव्हेतृप्ती ॥ चढतीप्रीतिमजलागीं ॥ ६३ ॥ गोपिकाकरूनिमाझीभक्ती ॥ मीप्रसन्नकेलोंश्रीपती ॥ रासमार्गी
तलाएकांतीं ॥ माझीस्फुरवप्राप्तीपावावया ॥ ६४ ॥ त्याजाणवेदगर्भीचाश्रुती ॥ श्रुतिरूपेंनव्हेमत्प्राप्ती ॥ तेंपरतल्याह्मणोनिनेति
नेती ॥ माझीस्फुरवसंपत्तीनपवेची ॥ ६५ ॥ विषयबुद्धीतेमुख्यअज्ञान ॥ तेंअसतांमीनभेटेंजाण ॥ असतांवेदोक्तजाणपण ॥ ते
णेंहीसंपूर्णनभेटेंमी ॥ ६६ ॥ जाणिवनेणिवगेलियाविशेष ॥ माझेंपाविजेनिजात्मस्फुरव ॥ श्रुतिजाणोनिहोंनिष्टंक ॥ गोकुळीं
त्यादेरवसुरवार्थआल्या ॥ ६७ ॥ त्याचिजाणसमस्तश्रुती ॥ गोपिकारूपेंगोकुळायेती ॥ रासक्रीडामिसेंएकांतीं ॥ माझीस्फुरवप्रा
प्तीपावल्या ॥ ६८ ॥ हाहिअसोअभिप्रावो ॥ उद्धवाज्यांसिजैसाभावो ॥ त्यांलागिमीतैसादेवो ॥ यदर्थीसंदेहअसेना ॥ ६९ ॥ उद्धवामी
भक्तांसिदेरव ॥ कोणकाळींनव्हेविमुरव ॥ जोजेसाभावीभाविक ॥ तैसामीदेरवनयासी ॥ ७० ॥ मीसकामसकामाचाठायीं ॥ नि
ष्कामासिंनिष्काम पाहीं ॥ नास्तिकामीलोकींतिहीं ॥ असतचिनाहींनास्तिक्यें ॥ ७१ ॥ असोहेंकितंउपपत्ती ॥ ऐकगोपिकांसीमा
झीप्रीती ॥ माझेंस्फुरवेंज्याभोगिल्याराती ॥ त्यामानितीनिमिष्यार्ध ॥ ७२ ॥ माझ्यावियोगेंत्यासिराती ॥ ज्याआलियायथास्थि
ती ॥ त्यागोपिकाकल्पप्रायमानितीं ॥ सन्निधस्वपतीअसतांही ॥ ७३ ॥ त्यांच्यादुःरवाचीअवस्था ॥ बोलेंनबोलवेसर्वथा ॥ माझे
निवियोगेंमातेंस्मरतां ॥ समाधीअवस्थापावल्या ॥ ७४ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ तानाविदन्मय्यनुषंगबद्धधियःस्वमात्मानमदस्
तथेदम् ॥ यथासमाधौमुनयोऽब्धितोयेनद्यःप्रविष्टाइवनामरूपे ॥ १२ ॥ ॥ टीका ॥ ॥ मजगोकुळींअसतां ॥ माझेठा
यींआसक्तचित्ता ॥ हेंअवघीसमूळकथा ॥ तुजम्यातत्वतासांगीतली ॥ ७५ ॥ ऐशियासीम्यानिचाडता ॥ कृतघ्नाचेपरीसांडू
निजातां ॥ माझ्यावियोगकाळींचीव्यथा ॥ पाषाणपाहातांतटतटी ॥ ७६ ॥ यापरीमजवेगव्याअसतां ॥ मागेंमाझीकथा
वार्त्ता ॥ सदांमाझेंस्मरणकरितां ॥ मदाकारतापावल्या ॥ ७७ ॥ करितांदळणकांडण ॥ माझेदीर्घस्वरेंगातीगुण ॥ कींआद

रल्यादधिमथन ॥ माझें चरित्रगायन करितां ॥ ७८ ॥ [illegible]रितां सडासंमा[illegible] ॥ समाझें ध्यान ॥ माझें नामस्मरण जाण ॥ पा
येदेणें बाळकां ॥ ७९ ॥ गाईचें दोहन करितां ॥ [illegible]स्मरणीं आसक्तता ॥ एवं सर्व कर्मीं वर्ततां ॥ माझी विसराची वार्ता विसरल्या
॥ ८० ॥ करितां गमनागमन ॥ अखंड मा[illegible]ठाईं मन ॥ आसन भोजन प्राशन ॥ करितां मत्ध्यान तयांसी ॥ ८१ ॥ एवं मज गोलिया
पाठीं ॥ ऐशी माझी आवडी मोठी ॥ अ[illegible]ड माझ्याठायीं दृष्टी ॥ माझ्याचि गोष्टी सर्वदा ॥ ८२ ॥ ऐशा अनन्यठायांच्या ठायीं ॥ गो
पिकांसि माझी प्रीति पाहीं ॥ त्या वर्त[illegible]ह देहगेहीं ॥ माझ्याठायीं विनटल्या ॥ ८३ ॥ यापरी बुद्धिमदाकार ॥ ह्मणोनि विसरल्या
घरदार ॥ विसरल्या पुत्र भ्रतार ॥ नि[illegible]आपार विसरल्या ॥ ८४ ॥ विसरल्या पि[illegible] ॥ विसर[illegible]सुखदुःख ॥ विसरल्या ना
हानभुक ॥ माझें नियें कनिज ध्यासें ॥ [illegible] ॥ जेणें देहें पतिपुत्रातें ॥ आप्त निमाले होते चित्तें ॥ तें चित्त रतलें मातें ॥ त्या देहातें वि-
सरोनी ॥ ८६ ॥ विसरल्या इहलोक पर[illegible]क ॥ विसरल्या कार्यकारण निःशेख ॥ विसरल्या नामरूप देख ॥ माझें ध्यानसुखभो
गितां ॥ ८७ ॥ निरसोनि तत्वांचे विकार ॥ [illegible]ाधी पावे मुनेश्वर ॥ तो बिसरे जेविं संसार ॥ तेविं मदाकार गोपिका ॥ ८८ ॥ जेविं कांना
नासरिता ॥ आलिया सिंधू तें ठाकितां ॥ त[illegible]पावोनि समरसता ॥ नामरूपता विसरल्या ॥ ८९ ॥ तेविं गोपिका अनन्य प्रीती ॥ मा
झीला होनियां प्राप्ती ॥ नामरूपाची विस्मृती ॥ [illegible]सरल्या स्फूर्ती स्फुरेना ॥ ९० ॥ सच्चिदानंदस्वरूप प्रभावो ॥ नेणतां माझा नि-
जस्वभावो ॥ गोपिकांचा अनन्यभावो ॥ परब्रह्म प[illegible]वि आपणया ॥ ९१ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ मत्कामा रमणं जारमस्वरूपविदोऽ
बलाः ॥ ब्रह्म मां परमं प्रापुः संगाच्छतसहस्रशः ॥ [illegible]तो ॥ २५ ॥ धूरण ॥ त्या केवळ अबळा निश्चितीं ॥ मत्संगाची अतिप्रीती ॥
तेहि संगती कामासक्ती ॥ शास्त्रप्रवृत्तिविरोधु ॥ ९२ ॥ मी नि[illegible]आरवुद्धें शास्त्रविधी ॥ रूपें मदनमोहन त्रिशुद्धी ॥ मज रतल्या ज्या
अविरुद्धीं ॥ जारबुद्धी अविचारें ॥ ९३ ॥ चौप्रकारांच्या कामिनी ॥ [illegible]त्तिनी इत्यादि षष्ठिणी ॥ चौघी सिचौं मुक्तिस्थानीं ॥ कामक्रोधि

नीमिरवती ॥ १४ ॥ इतर पुरुषाचे संगती ॥ क्षणभंगुर सुखभोगिती ॥ अविनाशनित्यसुखप्राप्ती ॥ [illegible] ॥ १५ ॥
स्वपतीसंगेक्षणीक आनंदु ॥ माजासुखाचा निजबोधु ॥ दिव्य अ[illegible]तीपरमानंदु ॥ स्वानंदकंदुसर्व [illegible] ॥ १६ ॥ [illegible] अवस्था
चपळा ॥ सांडूनिस्वपतीचासोहळा ॥ मजचिरतल्य[illegible]विशेष ॥ [illegible] ॥ [illegible] सात्त्विक ॥ [illegible]
डामीचएक ॥ यालागिमाझ्ाकामी कामिक ॥ [illegible] श्रुती ॥ [illegible]काचा ॥ १८ ॥ जीवीआतुलियं [illegible] ॥ मीचियेकजिवकूजाणे
॥ ऐसेंजाणोनिमजकारणे ॥ जीवेंप्राणेंविन[illegible]ल्या ॥ [illegible] अंगीप्रत्यांगीमीभोक्ता ॥ सर्वात्यसयोगनिर्विना ॥ ऐसेंजाणोनित
त्वता ॥ कामासक्तामजलागीं ॥ २०० ॥ [illegible]विभावकटाक्षगुण ॥ मीचिजाणेंउणखुण ॥ कोणवेळे कोणलक्षण ॥ कोणस्थान
मिळणीचें ॥ १ ॥ जेनिजोनियांनिजशेज[illegible] ॥ जेकाळींमाझीइच्छाकरी ॥ तेकाळींतेचिअवसरीं ॥ सुखशेजारीमीनिघवीं ॥ २ ॥ म
जकुडकुडेंनाहींयेणें ॥ नित्यनिजसेजे[illegible]नेववणें ॥ नाहींकडटणत्कारणें ॥ जेजीवेंप्राणेंअनुसरली ॥ ३ ॥ त्यासिभाळलेनिष्का
मतापसी ॥ ज्यासिभाळलेयोगीस[illegible]यासी ॥ गोपीभाळल्यात्यासी ॥ देहगेहासीविसरोनी ॥ ४ ॥ ऐसासर्वकामदायक ॥ पुरु-
षामाजीमीचिएक ॥ हागोपिकांजा[illegible]णोनिविवेक ॥ भावेंनिष्टंकधरियेला ॥ ५ ॥ म्यागोपिकांसिकामकेला ॥ कीत्यांचासर्वका
महरिला ॥ विचारितांअर्थइतुला ॥ म[illegible]क्षफावलामत्कामें ॥ ६ ॥ आंधारींगूळखातां ॥ कडूनलगेतोसर्वथा ॥ तेवीनेणोनिमा-
झीसच्चिदानंदता ॥ मातेंसेवितांमीज[illegible]नाहाल्या ॥ ७ ॥ परिसमानोनिपाषाण ॥ फोडूंजातांलोहाचेंघण ॥ लागतांचिहोयसुवर्ण ॥
तैशाजाणगोपिका ॥ ८ ॥ ज्यासिझाली[illegible]माझीसंगती ॥ त्याएकदोनसांगोंकिती ॥ शतसहस्रअमिती ॥ निजप्राप्तीनिजपदीं ॥ ९
॥ विषह्मणोनिअमृतघेतां ॥ मरणजाऊ[illegible]नियेअमरता ॥ तेवींजारबुद्धीमातेंभजतां ॥ माझीसायोज्यतापावल्या ॥ १० ॥ वैरागर
मणीप्रती ॥ खडेलागलेहिरेहोती ॥ तैशागोपिकाम[illegible]त्यासंगती ॥ नेणोंकितीउद्धरल्या ॥ ११ ॥ मीपरब्रह्ममूर्तीचोखडी ॥ म्या

॥ज्ञयाव्याभिचारें परवडा ॥ धुतल्या आवघ्या पापकांडा ॥ मुक्त राकडा पावल्या ॥१२॥ मी अर्थधाम ॥ ज्ञानेंक ॥ सगळा ही इलजेच्या

सिप्राप्त ॥ तें मज पावले निश्चित ॥ संदेह येथ न धरावा ॥१३॥ माझे स्वरूपावरी लोक ॥ विकल्पें दांवितीनाना देख ॥ संत माझे नि

त्य निर्दोख ॥ सत्संगें सकरवें निर्दिष्ट ॥१४॥ उद्धवा तुवां येचि अर्थी ॥ बहुत न धरावी वित्पत्ती ॥ धरोनियां सत्संगती ॥ संसार गुंती उगवा

वी ॥१५॥ ॥श्लोके॥ ॥तस्मात्त्वमुद्धवोत्सृज्य चोदनां प्रतिचोदनाम् ॥ प्रवृत्तं च निवृत्तं च श्रोतव्यं श्रुतमेव च ॥१६॥ ॥टी

का॥ ॥माझें स्वरूप नित्य निर्गुण ॥ वेद नितका त्रिगुण ॥ त्या वेदाचें जें प्रेरण ॥ तें गोणा जाण मत्प्राप्ती ॥१६॥ त्या वेदार्थें श्रुति

स्मृती ॥ नाना कर्में करविती ॥ त्या कर्मांची कर्मगती ॥ न कळे निश्चिती कोण ॥ सो ॥ [illegible] ॥ विधिनिषेध

अति अवघड ॥ सज्ञानासी न कळे निचाड ॥ शास्त्रें दृढ विचारितां ॥१८॥ केवळ कर्मचि कर्मा आंत ॥ एक प्रवृत्त एक निवृत्त ॥ सका

म निष्काम अद्भुत ॥ आंगी आदळत साधका ॥१९॥ कर्म तितुकें अविद्यक ॥ वेद तो त्रिगुणात्मक ॥ तत्संबंधें श्रवण देख ॥ सा

धनरूप वेदांत ॥२०॥ तमोगुण कर्में कर्मकांड ॥ रजोगुणें उपासना कांड ॥ सत्वगुणें ज्ञानकांड ॥ वेद त्रिकांड त्रिगुणात्मक ॥२१

॥ वेदशास्त्र विधानविधी ॥ याचें मूळ अविद्या आधीं ॥ ते अविद्येस्तव देहबुद्धी ॥ विधिनिषेधां गोवित ॥२२॥ यालागीं उद्धवा

तूं आधीं ॥ सांडी अविद्या पात्री शुद्धी ॥ अविद्या सांडिल्या संबंधीं ॥ सहज वेदविधी सांडिली ॥२३॥ आधीं अविद्या ते कोण ॥

ऐंच आत्मानकळे ज्ञान ॥ मग तिचें निराकरण ॥ केविं आपण करावें ॥२४॥ निज कल्पनेचा जो बोध ॥ तेचि अविद्या स्वतःसिद्ध

॥ तेणेंचि बाधे विधिनिषेध ॥ तें त्यागिल्या शुद्ध ब्रह्म चित्तो ॥२५॥ धूर पडिलिया रणीं ॥ सहजें कटक जाय पळोनी ॥ तेविं अवि

द्या सांडितां सांडुणी ॥ विधिविधान दोनी सहजेंची ॥२६॥ आखु छेदिलिया पडिपाडें ॥ रथ न चले असतां हि घोडे ॥ ते अविद्या छे

दिलिया सुरवाडे ॥ विधिनिषेध पुढें न चलतं ॥२७॥ मूळ छेदिलिया एके घायीं ॥ शाखा पल्लव छेदिले पाहीं ॥ तेविं अविद्या छेदि

लियालवलाहीं॥विधिनिषेधराहीसहजेंची॥२८॥ऐकें वेदांचातात्पर्यार्थ॥मुख्यभजवामीभगवंत॥तोचिशास्त्रिंविषदार्थ
॥करीवेदार्थश्रवणार्थें॥२९॥श्रवणकेलियाचें फळजाण॥करावेंअविद्यानिरशन॥अविद्यानिरशिलियाश्रवण॥पुढारेंजाण
लागेना॥३०॥जेविंठाकिलियास्वस्थान॥पुढारेंनलगेगमनागमन॥तेविंझालियाअविद्यानिरशन॥श्रवणमननलागेना
॥३१॥ह्मणसीअविद्याकेविंसांडे॥हेंचिअवघडथोरमांडे॥जेअवघेंउगवेसांकडें॥तेंमीतुजपुढेंसांगेन॥३२॥वेदशास्त्रक
र्मविधान॥हेंअविद्यायुक्तसाधन॥तेंअविद्याजावयाजाण॥मजलागींशरणरिघावें॥३३॥ ॥श्लोक॥ ॥मामेकमेवश
रणमात्मानंसर्वदेहिनाम्॥याहिसर्वात्मभावेनमयास्याह्यकुतोभयः॥१५॥ ॥टीका॥ ॥सांडूनिस्त्रीपुत्रविषयध्यान॥
सांडूनियोगयोग्यताशाहाणपण॥सांडूनिकर्मरताकर्माभिमान॥मजलागींशरणरिघावें॥३४॥सांडूनियांवेदाध्ययन
॥सांडोनियांशास्त्रश्रवण॥सांडोनिप्रवृत्तीनिवृत्तीजाण॥मजलागींशरणरिघावें॥३५॥सांडोनियांवैदिकलौकिक॥सांडू
निआगमतांत्रिक॥मजशरणरिघालियादेख॥माझेंनिजसुखपावसी॥३६॥सांडूनिकुळाचेंउंचपण॥सांडूनिजाती
चाअभिमान॥सांडूनिआश्रमाचेंश्रेष्ठजाण॥मजलागींशरणरिघावें॥३७॥सर्वत्यागाचेंत्यागितेपण॥उद्धवातुजमीसांगे
नखुण॥सर्वसांडावाअभिमान॥हेंमुख्यलक्षणत्यागाचें॥३८॥सर्वहिसांडोनिअभिमान॥मजरिघालियाशरण॥तुजकैंचें
जन्ममरण॥माझेप्रतापेंजाणनरशील॥३९॥ह्मणसीशरणरिघावेंकवणेठायीं॥तरिंमीअसेंतुझ्याह्रदयीं॥त्याह्रदयस्था
सिलवलाहीं॥शरणपाहींरिघावें॥४०॥सर्वभावेंसर्वस्वसी॥मजह्रदयस्थाशरणयेसी॥तेंमाझीसर्वगततापावसी॥सर्वभू
तनिवासीह्रदयस्थ॥४१॥तिळभरीराखोनिअभिमान॥जरीमजरिघसीशरण॥तरिमाझीप्राप्तीनव्हेजाण॥अभिमानवि
घ्नमासीसी॥४२॥श्वानेंस्पर्शिलेंपक्वान्न॥तेंजेविंनातळतीब्राह्मण॥तेंविंजीवांअत्यंतअभिमान॥माधकामीमीजाणना

तकें ॥ ४३ ॥ रजस्वलेचीं एंकोनि वाणी ॥ दूर पळिजे पुरश्चरणीं ॥ तेविं अहंकाराच्या साधनीं ॥ थितां जवळूनि मी जायें ॥ ४४ ॥ रजकवि
टाळाचें जीवन ॥ जेविं नातळती सज्जन ॥ तेविं हृदयीं असतां अभिमान ॥ उद्धवा मी जाण न भेटें ॥ ४५ ॥ डोळां हरळ न जिरे ॥ घायीं
चाकोतन जिरे ॥ सरां दाजेविं न सरे ॥ [illegible] ॥ ४६ ॥ तेविं मज माजी अभिमान ॥ उद्धवा न रिघे न जाय ॥ हे त्यागतात्पर्याची
खुण ॥ तुज म्यां संपूर्ण सांगीतली ॥ ४७ ॥ पत्नी विश्वरतां परपुरुषीं ॥ देखोनि निज पती त्यागी तिसी ॥ तेविं अभिमानरत भक्तीं
सी ॥ मी हृषीकेशी नातळें ॥ ४८ ॥ यालागीं सांडूनि अभिमान ॥ मज हृदयस्था रिघालिया शरण ॥ तुज नाहीं संकरी न जाण ॥ देव
कीची आण उद्धवा ॥ ४९ ॥ ह्मणसी तुज दोघी माता ॥ कोणती ची आण गा तूं सत्यता ॥ मज तुझीचि आण तत्वता ॥ तुज निर्भय त
माझेनी ॥ ५० ॥ तूं बोलीना तुडसी कहीं ॥ तुज सर्वथा क्रिया नाहीं ॥ तुझी आण भाकूं या नावी काई ॥ ऐसें जरी काहीं कल्पिसी ॥
॥ ५१ ॥ पातेजूनि तुझिया बोलासी ॥ थितें सांडावें स्वधर्मासी ॥ ल टकें जाहलिया आणेसी ॥ कोणे समर्थासी भांडावें ॥ ५२ ॥ उद्ध
वा ऐसें न ह्मण ॥ म्या जे वाहिली तुझी आण ॥ तें परमात्म्याचि शपथ प्रमाण ॥ सत्य जाण सर्वथा ॥ ५३ ॥ उद्धवा तूं आत्मा परिपूर्ण ॥ मज
तुज नाहीं मी तूंपण ॥ त्या तुझी म्यां वाहिली आण ॥ परम प्रमाण परमात्मना ॥ ५४ ॥ असतां प्रत्यक्षप्रमाण ॥ कां लागे भाक आ
ण ॥ सर्वभावें मज आलिया शरण ॥ आर्तीं च जाण तरशील ॥ ५५ ॥ मज शरण रिघाल्या वाडें कोडें ॥ कळिकाळ तुझिया पा
यां पडे ॥ का इसें भवभय बापुडें ॥ कोण तुजकडे पाहेल ॥ ५६ ॥ शरण रिघतां चि तत्काळ ॥ तूं ह्मासी माझें स्वरूप ॥ ते व्हां भवभ
यपळे सकळ ॥ तुज कळिकाळ कांपती ॥ ५७ ॥ तु [illegible] निरसूं लागे ॥ तो जा [illegible] ना चे दांग ॥ तैसें शरण आ
लिया [illegible] ॥ ५८ ॥ [illegible] ॥ तो हृदयस्थ न कळे आह्मांसी ॥ उद्धवा तूं ऐसें ह्म
णसी ॥ तरी ऐक [illegible] अभिमान ॥ स्फुरे जेथें कोउद्धवपण ॥ तें सज हृदयस्थाचें रूप जाण

भा॰
११

त्यातुवांशरणरिघावें॥६०॥नामरूपगुणवार्त्ता॥हेमायाजाणतत्वता॥तेंसांडूनिजेस्फुरेसत्ता॥तेंमजन्हृदयस्थाचेंरूप॥६१॥
ऐसेंनिजहृदयस्थजोडल्यापाहाहो॥तेव्हांसर्वभूतींपाहातांदेवो॥तेथवेगळाउरावयाउद्धवो॥रिताठावोनाहींसर्वथा॥६२॥तेव्हां
सर्वभूतींमीएकु॥निश्चयेंजाणनिष्टंकु॥देखतांहिअनेकलोकु॥त्यासिमीएकुएकला॥६३॥ऐसातूंमिळोनिहृदयस्थासी॥
मीहोऊनिमजपाहासी॥माझीप्राप्तीउद्धवाऐशी॥निर्भयेंसिनिश्चित॥६४॥ऐशीसांगोनिगुह्यगोष्टी॥देवोउद्धवाचेपाठी
थापटी॥येरेंचरणींघातलीमिठी॥उठितांनुठीसर्वथा॥६५॥तुवांजेंसांगीतलेंगुज॥तेंभजमानलेंगामहज॥बोलाएकाचा
संशयमज॥तेंमीतुजपुसेन॥६६॥ ॥श्लोक॥ ॥उद्धवउवाच॥ ॥संशयःशृण्वतोवाचंतवयोगेश्वरेश्वर॥ननिवर्ततआ
त्मस्थोयेनभ्राम्यतिमेमनः॥१६॥ ॥टीका॥ ॥वेदशास्त्रांचेंमथितसार॥योगदुर्गीचेंभांडार॥पिकल्यासुखाचासागर॥
मजसाचारउपदेशिला॥६७॥स्वेस्वेकर्मण्यभिरत॥येणेंचिब्रह्मणशीवस्तप्राप्त॥तेंहिसांडूनिसमस्त॥शरणनिश्चितरिघा-
व्याणसी॥६८॥तूंयोगियांचायोगेश्वर॥सकळजगाचाईश्वर॥तुझेंसत्यगाउत्तर॥संशयकरमजवाटे॥६९॥तुवांचसां
गीतलेंसाक्षेपेंजाण॥करावेंगास्वधर्माचरण॥तेंसत्यमानूनिवचन॥सर्वस्वेंजाणविश्वासलों॥७०॥करावेंजेंस्वधर्माच
रण॥तेंचब्रह्मणशीमाझेंभजन॥शिखवीतेंहिआतांसांडऊन॥रिघावेंशरणम्हणतोसी॥७१॥नरींआत्माकर्त्ताकींअकर्त्ता॥
हेंचिनकळेतत्वता॥कर्मकरावेंकींसर्वथा॥आह्मीआतांसांडावें॥७२॥तुझीविषमउपदेशवित्पत्ती॥सांगतांआह्मांअध
ळांप्रती॥थोरसंदेहवाटेचित्तीं॥कायश्रीपतीकरावें॥७३॥जरीआत्माझालाअकर्त्ता॥तरीकर्माचाकोणकर्त्ता॥जेंआ
त्म्यासिअकर्तव्यता॥तेंत्यागसर्वथाघडेना॥७४॥ऐकोनिउद्धवाचाप्रश्न॥सांवळाराजीवलोचन॥कायबोलिलाहांसो
न॥सावधानपरिसावें॥२७५॥ ॥श्लोक॥ ॥श्रीभगवानुवाच॥ ॥सएषजीवोविवरप्रसूतिःप्राणेनघोषेणगु

कृपाळू स्वामी श्रीकृष्ण ॥ यालागीं श्रीशुक आपण ॥ करी मनन अनन्यथा ॥ ८५ ॥ श्लोक ॥ भवभयमपहंतुं ज्ञानविज्ञानसारं निगमकृ
दुपजह्रे भृंगवद्वेदसारं ॥ अमृतमुदधितश्चापाययद्भृत्यवर्गान्पुरुषमृषभमाद्यं कृष्णसंज्ञं नतोऽस्मि ॥ ४९ ॥ ॥ टीका ॥ संसारभयें त्रासले
॥ जे कृष्णासी शरण आले ॥ त्यांचें भवभय हरावया वहिलें ॥ जेणें मथन केलें वेदार्थां ॥ ८६ ॥ मथुनी उपनिषद्द्वार ॥ काढिलें ज्ञानविज्ञान
सार ॥ जालागीं शिणले ज्ञाते नर ॥ नयासी पिलें मरवांकुना ॥ ८७ ॥ स्वगर्भीं निगम मथितां ॥ वेदासी जाली परम व्यथा ॥ कृष्ण वेदाचा
आदिकर्ता ॥ तो दुःख सर्वथा होंनेदी ॥ ८८ ॥ जैं विवासकरा गायी दुहिता ॥ वासराला न लगे सर्वथा ॥ तेवीं श्रीकृष्ण वेद मथिता ॥ वेदासी
वेथा बाधीना ॥ ८९ ॥ जो सर्वज्ञ हृषीकेश ॥ वेदार्थसार राजहंस ॥ तेणें नेदितां दुःखक्लेश ॥ वेदसारांश काढिला ॥ ९० ॥ एवं वेदार्थ निजम
थित ॥ ज्ञानविज्ञानसारामृत ॥ कृष्ण काढूनि इत्थंभूत ॥ भृत्यहितार्थ कृपा अर्पी ॥ ९१ ॥ जैं भक्तकुवारपणें षट्पद ॥ काढी कमळमकरंद
तेवीं मथूनियां वेद ॥ श्रीकृष्णें सारशुद्ध काढिलें ॥ ९२ ॥ यापरी श्रीकृष्णनाथ ॥ भक्तकृपाळु कृपावंत ॥ काढूनि वेदसारामृत ॥ निजभृत्यां दे
तो निर्भय ॥ ९३ ॥ ऐसें वेदसारामृत पूर्ण ॥ भृत्यांसी पाजून श्रीकृष्ण ॥ निजभक्तांचें जन्ममरण ॥ निर्दळी संपूर्ण भवभय ॥ ९४ ॥ जगाचें माया
सुरम्य कारण ॥ कृष्ण मायेचें निजकारण ॥ जें स्वरूप सच्चिदानंदघन ॥ त्यासी श्रीकृष्ण नामाची संज्ञा असे ॥ ९५ ॥ येऊनि मायामनुष्य नट
॥ पुरुषांमाजी पुरुषश्रेष्ठ ॥ पूर्णज्ञानें ज्ञाननिष्ठ ॥ वंदनीं वरिष्ठ श्रीकृष्ण ॥ ९६ ॥ त्यासी कायावाचा आणि मन ॥ सर्वार्थीं अनन्य शरण ॥ या
परी श्रीशुक आपण ॥ करी नमन श्रीकृष्णा ॥ ९७ ॥ ऐसें श्रीशुकें केलें नमन ॥ तेणें परीक्षिती संभ्रम पूर्ण ॥ भक्तकृपाळु एक श्रीकृष्ण ॥
दुसरा जाण असेना ॥ ९८ ॥ उद्धव पावला परमनिर्वाण ॥ सरलें ज्ञानकथानिरूपण ॥ जगीं श्रेष्ठ भगवद्भजन ॥ भक्तां आधीन श्रीकृष्ण ॥ ९९
॥ जें जें भक्तांचे मनोगत ॥ तें ते पुरवी श्रीकृष्णनाथ ॥ शेखीं निजपद देत ॥ कृपा समर्थ भक्तांची ॥ १००० ॥ निजधामा निघतां श्रीकृष्ण ॥
उद्धव करितां हें प्रश्न ॥ तरी हें परमामृत कथन ॥ सर्वथा श्रीकृष्ण न बोलता ॥ १ ॥ यालागीं उद्धवाचा महाथोर ॥ जगासी जाला उपकार

भक्तीज्ञानवैराग्यसार॥ जाचंनिसारंगधरस्वयेंवदला॥२॥ उध्दवाचंनिधर्म जाण ॥ भवाब्धीतरेत्रिभुवन॥ ऐसेंबोलविलें ब्रह्मज्ञा
न॥जेंगुह्यभजनसप्रेम॥३॥ उपेक्षूनीचारीमुक्ती॥ उध्दवेंथाराधिलीहरीभक्ती॥ एवढाउध्दवकेलाख्याती॥ त्रिजगतीतरावया॥
॥४॥ एकादशाचेनिनावें॥ यानलीभक्तीमुक्तीचीपदें॥ येवढीकीर्तिकेलीउध्दवें॥ जडजीवेंतरावया॥५॥ धेनूचाठांईक्षीरपूर्ण॥प
रीहातानयेवत्सेंविण॥ तेंवीश्रीकृष्णाचेंपूर्णज्ञान॥ उध्दवेंजाणप्रगटकेलें॥६॥ कृष्णउध्दवसंवादकथन॥ तेंअतिशयेंज्ञानघन॥ते
थमीअपुरतेंदीन॥ केविव्याख्यानकरवेल॥७॥ कृष्णउध्दवज्ञानघन॥ त्याचेंकरावयाव्याख्यान॥ साह्यजालाजनार्दन॥ जोसर्व-
ज्ञसर्वार्थी॥८॥ पदपदार्थसंगती॥ ज्ञानाचीपरिपाकस्थिती॥ वैराग्ययुक्तभक्तीमुक्ती॥ हेंहिविन्यस्तमीनेणें॥९॥ मासेंजेंकांमीपण
॥ तेंहीजालाजनार्दन॥ तद्व्दांपदपदार्थव्याख्यान॥ कर्ताजाणतोएक॥१०॥ तोएकएकपणाचेनिभावें॥ एक्यतापावलीस्वभावें॥ए-
काजनार्दनयानावें॥ हाग्रंथदेवेंविस्तारिला॥११॥ माझीबुधिचीहीबुधी॥ जनार्दनजालाअर्थावबोधी॥ कथितयुक्तपदसंदी॥वद
ताभिशब्दजनार्दन॥१२॥ माझेंनामरूपकर्मगुण॥ सुधिपाहतांमिथ्याजाण॥ परीतेंहीजालाजनार्दन॥ ऐसेंएकपणपाटियेंते॥
॥१३॥ नावंभावेंएकपण॥ यालागींतुष्टजालाजनार्दन॥ तेंणमाझाठावाऐसेंजाण॥ जगींएकपणप्रकाशिलें॥१४॥ एकायानामा
चेंकवतिक॥ जनार्दनाशींएकदेख॥ तेणेंतोमजशींजालाएक॥ मीतूंजाणम्हणतांही॥१५॥ एकायानावाचेंकौतुक॥ जनासीऐसें
देख॥ एकत्वप्रकाशीअनेक॥ अनेकींएकअविकारी॥१६॥ नावएकभावएक॥ त्यासीदेवाचेंसर्वदाएक॥ मगतोएकानेक॥भि
न्नत्वदेखअसेना॥१७॥ हेंएकत्वजवनयेहाता॥ तवतन्मभेदवर्ताचाभसन्नता॥ एकत्वावांचुनीसर्वथा॥ भक्तांनमुक्तकल्पेना॥१८॥ न
वकर्तव्याचाअहंभावा॥ तवसर्वयानलभेदवो॥ अहंपाशीवर्धनशीठावा॥ मुक्ततापदाहोतत्यांगं॥१९॥ नामरूपेंएकपण॥ हेंविमाझें
अनुष्ठान॥ तेणेंतुष्टलाजनार्दन॥ माझेंमीपणतोजाला॥२०॥ जेंविबाहुल्याचेंरखवणें॥ तेथरूसणेंआणीसंतोषणें॥ हेंरवेळवित्या-

चेंकरणें ॥ बाहुलीनेणे तो अर्थ ॥ २१ ॥ तेंवि माझें निनावें कविना ॥ करूनी जनार्दन जाला वक्ता ॥ यालागीं हे ग्रंथकथा ॥ साधुसंतां पढि
यंती ॥ २२ ॥ देह अहंता ग्रंथ करिना ॥ फिकट होईल न ये हाता ॥ येथ जनार्दन जाला कर्ता ॥ ग्रंथ ग्रंथार्थ तेणें आला ॥ २३ ॥ देखोनि मराठी
गोठी ॥ नह्मणावी वृथा चावटी ॥ पाहावी निज बोधक सवटी ॥ निजात्मदृष्टी सज्जनीं ॥ २४ ॥ संस्कृत बंध प्राकृत निंद्य ॥ हें बोलणें काय येथ
तीं शुद्ध ॥ हाही अभिमानवाद ॥ अहंता अशुद्ध परमार्थी ॥ १०२५ ॥ मोलें भूमि खणितां वैरागरीं ॥ अवचटें अनर्घ्य रत्नलाभे करीं ॥
तें रत्न सांपडल्या घरीं ॥ काय चतुरीं सांडावें ॥ २६ ॥ तेंवि संस्कृत आटाटी ॥ सहसा परमार्थीं न दे भेटी ॥ तें विजोडल्या मराठी साटीं ॥ ते
थ पालिती मी ठासज्ञान ॥ २७ ॥ चकोर चंद्रामृत प्राशन ॥ घायसां पडे तेथें लंघन ॥ तेंवि हा महाराष्ट्र ग्रंथ जाण ॥ फळा फळपण ज्ञान अ
ज्ञाना ॥ २८ ॥ देवासी नाहीं वाचाभिमान ॥ संस्कृत प्राकृत त्या समान ॥ जावाणीं जालें ब्रह्मकथन ॥ त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे ॥ २९ ॥ सा
जुक आणि सकळीं ॥ सुवर्ण सुमनीं नाहीं चाली ॥ तेंवि संस्कृत प्राकृत बोली ॥ ब्रह्मकथनें आली समत्वा ॥ ३० ॥ संस्कृत भाषे निंदा कु-
ळीं नरी न काय पावन जाली ॥ प्राकृत भाषा हरिकथा केली ॥ ते वृथा गेली ह्मणवेना ॥ ३१ ॥ जो जो भाषा अभिमान ॥ तो तो वक्त्यासी बा
धक पूर्ण ॥ जा भाषां केलें ब्रह्मकथन ॥ तें न होय पावन हरिचरणीं ॥ ३२ ॥ माझी मराठी भाषा चोखडी ॥ परी परब्रह्में फळली गाढी ॥ संत
सज्जन जाणती गोडी ॥ त्यालागीं जोडी जोडिला ग्रंथ ॥ ३३ ॥ हे जनार्दन कविता वाडी ॥ ब्रह्मरसें रसाळ गाढी ॥ जे जनार्दनें लाविली गो
डी ॥ ते चवी न सोडी ग्रंथार्थ ॥ ३४ ॥ उद्धवव्याजें स्वयें श्रीकृष्ण ॥ वदला पूर्ण ब्रह्मज्ञान ॥ येणें छेदुनी भवबंधन ॥ दीन जन नरावया ॥ ३५ ॥
तो हा एकादशाचा ग्रंथ ॥ येथ ठाकठोक परमार्थ ॥ येणें महाकवी समस्त ॥ निजहितार्थ पावले ॥ ३६ ॥ पक्षफळीं शुकझेंपावे ॥ तेथें मुंगी हीरी
ग मुरावें ॥ तेंवी महाकवींचें वोषिभवें ॥ मीही पावें प्राकृत ॥ महारायाचा नाटापाशीं ॥ रिगमु नाहीं समर्थासी ॥ तेथें सुखवासी बैसे माशी-
तेंविम्हा आयासी प्राकृत ॥ ३८ ॥ भोजनीं धरानी बापाचा हात ॥ गांडतें आधी बालक खात ॥ तेंवि महाकवीच्या अनुभवांत ॥ प्राकृतें

परमार्थमीहीलाभें ॥ ३९ ॥ मीलाभेंसद्गुरुचरण ॥ तेणेंहेंचालिलेंनिरूपण ॥ बापकृपाळूजनार्दन ॥ ग्रंथसंपूर्णतेणेंकेला ॥ ४० ॥ हा 
णालपूर्णजालापरमार्थ ॥ पुढेंआहेमहाअनर्थ ॥ तैसानव्हेगुह्यज्ञानार्थ ॥ स्वयंकृष्णानाथदावील ॥ ४१ ॥ मातापितास्त्रीपुत्रजन ॥
जातीगोतसुहृदसज्जन ॥ सकळकुळकुळासीयेतांमरण ॥ ममतानश्रीकृष्णाकदानधरी ॥ ४२ ॥ कृष्णाआज्ञाकाळवंदामाथां ॥ एवढी
हातींअसतांसत्ता ॥ तरीकुळनिर्दळणींममता ॥ श्रीकृष्णानाथाअसेना ॥ ४३ ॥ जासीदेहींनिरभिमानता ॥ त्यासीबाधीनाकुळाची
ममता ॥ तेंदेहींचीनिरहंकारता ॥ श्रीकृष्णआतांस्वांगेंदावी ॥ ४४ ॥ तुझेंज्ञानपरिपाकनिर्वाण ॥ अतिगोडाचेंनिरूपण ॥ पुढिलेदोंअ
ध्यायींजाण ॥ श्रीशुकआपणसांगेल ॥ ४५ ॥ तेंज्ञानगुह्यनिजकथा ॥ जनार्दनकृपानत्वता ॥ एकाजनार्दनवक्ता ॥ अवधानश्रोतींम
ज्ञद्यावें ॥ ४६ ॥ जेथेंसंतअवधानदेती ॥ तेंकथावोडविलीपरमार्थे ॥ एकाजनार्दनीविनंती ॥ अवधानयथार्थीमजद्यावें ॥ ४७ ॥ इति
श्रीमद्भागवतेमहापुराणेएकादशस्कंधेभगवदुद्धवसंवादेएकाकारटीकायांपरमार्थप्राप्तीसुगमोपायउद्धवबदरीकाश्रमप्रवेशो
नामएकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ संख्या ॥ श्लोक ५१ ॥ ओंव्या १०४७ ॥ एकुण १०९८ ॥ ६ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥जयजयसद्गुरूअनादी॥जयजयसद्गुरूसर्वसिद्धी॥जयजयसद्गुरूआनंदनिधी॥जयजयकृपाब्धीकृपाळुवा॥१॥
जयजयवेदवाचका॥जयजयवेदप्रकाशका॥जयजयवेदप्रतिपादका॥जयजयवेदात्मकावेदज्ञा॥२॥जयजयविश्वप्रकाशका॥जय
जयविश्वप्रतिपाळका॥जयजयविश्वनिवासका॥अकर्तात्मकाअव्यया॥३॥तुझीअव्ययअक्षरस्थिती॥नाहींनामरूपवर्णव्यक्ती॥तो
तूंनांदसीजातीगोती॥लोकस्थितीव्यवहारें॥४॥तुजजगींनाहींदुसरें॥तोतूंगृहस्थघरदारें॥तूंनपुंसकसाचारें॥कींस्त्रीपुत्रेंनांदती
॥५॥अजआणिवंदिसीपिता॥अजन्मातोनमिसीमाता॥जगींतुझीसर्वसमता॥शेखींअरिमित्रनाचाळिसी॥६॥तूंजगन्नाथजगचा
ळक॥कींएकाचाहोसीसेवक॥तूंपरिपूर्णपूर्णात्मक॥कींमागसीभीकरंकत्वें॥७॥तूंनैष्ठिक्यब्रह्मचारी॥कींव्यभिचारेंतारिसीनारी॥
तूंसर्वज्ञगुरूचाद्वारीं॥तृणकाष्ठेंसिरींवाहासी॥८॥जोतूंकळिकाळातेंग्रासिसी॥तोतूंबागुलाभेणेंलपसी॥तूंमायानियंताहृषीकेशी
॥शेखींमायाबांधीजशीउखळीं॥९॥तोतूंआत्मारामनित्यतृप्त॥शेखींगोवळांचारखाशीभात॥तुझाब्रह्मादिकांनकळेअंत॥तोतूं
उभारडतयशोदेपाशीं॥१०॥त्रैलोक्यदाविसीउदरीं॥तोतूंगोपिकांचेकडियेवरी॥तूंजगाचाचाळकश्रीहरी॥त्यातुजलेंकुरींशिकवि
जेचालूं॥११॥ जोतूंसर्ववंद्यसर्वेश्वर॥तोतूंहोसीपांढराठुकर॥एकंकरितांतुझानिर्धार॥वेदांविचारकळेना॥१२॥वेदीं घेतलेंमहामौ
न॥ज्ञातेझालेनेणतेकोण॥योगीवकघलेरान॥तुझेंमहिमानकळेना॥१३॥मुख्यत्वेंजन्मनाहींजाण॥तोकृष्णादावीकैसेंमरण॥तेंएका
दशनिरूपण॥परिक्षितीपूर्णश्रद्धाळू॥१४॥प्रथमोध्यायीवैराग्यार्थ॥मुसळबोलिलेंशापयुक्त॥तेंविप्रांथावसानीयेथ॥असेपुस
तपरिक्षिती॥१५॥ ॥श्लोक॥राजोवाच॥ततोमहाभागवतेउद्धवेनिर्गतेवनं॥द्वारवत्यांकिमकरोद्भगवान्भूतभावनः॥१॥ ॥
टीका॥जोपांडवकुळींकुळरत्न॥कींकौरवकुळींकुळभूषण॥जोधर्माचेंनिजलक्षण॥कलीचेंनिग्रहणजेणेंकेलें॥१६॥ऐसाराजा
परिक्षिती॥धैर्यवीर्यउदारकीर्ती॥तेणेंस्वमुखेंश्रीशुकामती॥केलीविनंतीअतिश्रद्धा॥१७॥उद्धवपावोनिपूर्णज्ञान॥तोबद्रिकाश्रमागेलि

याजाण॥मागेंद्वारकेसीश्रीकृष्ण॥कायआपणकरिताझाला॥१८॥उत्पत्तिस्थितिनिधन॥जोइच्छामात्रेंकरीजाण॥तोस्वदेहाचेंविसर्जन॥कैसे
निश्रीकृष्णाकरिताझाला॥१९॥ ॥श्लोक॥ब्रह्मशापोपसंसृष्टेस्वकुलेयादवर्षभः॥प्रेयसींसर्वनेत्राणां॥तनुंसकथमत्यजत्॥२॥ ॥
टीका॥ब्रह्मशापेंश्रीकृष्णानाथ॥निःशेषनिजकुळाशिघात॥कैसेनिकरविलाययथ॥हेंस्फुनिश्चितसांगावें॥२०॥जननयनअल्हादक
र॥कृष्णातनूअतिसुंदर॥जेदेखतांत्रिनेत्र॥हर्षेनिर्भरस्वानंदें॥२१॥ऐशीअल्हादकारकतनू॥कैसेनिसांडीश्रीकृष्णु॥ब्रह्मशापाशि
मिउनी॥तोकांनिजतनूसांडिताझाला॥२२॥कृष्णपरब्रह्मपरिपूर्ण॥त्यासिबाधिनाशापबंधन॥तोहिसत्यकरीब्रह्मवचन॥यादववं
शीतनुसांडुनी॥२३॥दृष्टीदेखतांश्रीकृष्ण॥स्फुरेसुखावेंजगप्राण॥त्यासिसौंदर्याचेंनिरूपण॥राजाआपणसांगत॥२४॥ ॥
श्लोक॥प्रत्याकृष्टंनयनमबलायत्रलग्नंनशेकुःकर्णाविष्टंनसरतिततोयत्सतामात्मलग्नं॥यच्छ्रीर्वाचांजनयतिरतिंकिंनुमानंकवी
नांदृष्ट्वाजिष्णोर्युधिरथगतंयच्चतत्साम्यमायुः॥३॥ ॥टीका॥ज्याचीअकराइंद्रियांसदांगोडी॥भोगिजेंनवतंवप्रीतिगाढी॥कदां
वीनटयेअनावडी॥अविटगोडीकृष्णाची॥२५॥बाळाप्रौढामुग्धाप्रगल्भाव्यक्ता॥ऐशीचतुर्विधास्त्रियांचीजाती॥तिहींदेखिल्या
श्रीकृष्णमूर्ती॥दृष्टीमागुतीपरतेना॥२६॥ज्याधार्मिकाधैर्यवृत्ती॥ज्यापतिव्रतामहासती॥तिहींदेखिल्याकृष्णमूर्ती॥दृष्टिमागुतीप
रतेना॥२७॥ज्याकांअबळाअभुक्तकाम॥ज्याअतिवृद्धाअतिनिष्काम॥तिहींदेखिल्यामेघःशाम॥नयनसकामहरिरूपीं॥२८॥
जेंविलवणजळामेटी॥तेविंश्रीकृष्णीस्त्रियांचीदिठी॥मिराळलियाउठाउठी॥परतोंनिमिठीस्फुटेना॥२९॥एवंदेखिलियाश्रीकृ
ष्णमूर्ती॥स्त्रियांचियानिजात्मशक्ती॥दृष्टीपरतेनामागुती॥एशीनयनांप्रीतीहरीरूपीं॥३०॥स्त्रियाबापुड्यात्याकिती॥जेसंतविर
क्तपरमार्थी॥त्यांचेश्रवणींपडतांकीर्ती॥चित्तीकृष्णमूर्तीठसावे॥३१॥चित्तींठसावोनिकृष्णमूर्ती॥चित्तचिआणीकृष्णस्थिती॥ऐशी
कृष्णाचीकृष्णकीर्ती॥चित्तवृत्तीआकर्षी॥३२॥संतांचीआकर्षीचित्तवृत्ती॥हेंनवलनव्हेकृष्णकीर्ती॥कीर्तीऐकतांअसंतीं॥तेहिहोतीन

द्रूप॥३३॥स्पर्शतांचंदनाचापवन॥खैरधामोडेहोतीचंदन॥तेविंकृष्णाकीर्तीश्रवण॥देसमाधानसमसाम्यें॥३४॥भावेंऐकतांकृष्णकीर्ती॥
असंतहिसंतत्वायेती॥मगसंतांसंतदोनीस्थिती॥हारपतीसमसाम्यें॥३५॥महाकवीवर्णितांकृष्णकीर्ती॥पावलेपरमसाम्यस्थिती॥तेकृ
ष्णकीर्तीजेवर्णिती॥तेहिपावतीअतिशोभा॥३६॥कवीश्वरांनवरसिकु॥नवरंगडाश्रीकृष्णएकु॥जोजोवर्णीरसविशेखु॥तोतोयदुनायकु
स्वयेंहोय॥३७॥महाकविआदिकरूनी॥कवीश्वरांकीर्तीजननी॥जेंविनटलेहरिकीर्तनीं॥वंद्यवाणीतयांची॥३८॥कृष्णकीर्तीपवाडे॥ज्या
चीवाणीअखंडपडे॥तेवाचावंदिजेचंद्रचूडें॥त्याचापायांपडेयमकाळ॥३९॥जेथेंकृष्णकीर्तीकीर्तन॥तेथेंकर्माकर्मांचीउजवण॥होयसंसारा
चीबोळवण॥जन्ममरणसमवेत॥४०॥यापरीकीर्तीचेंमहिमान॥सर्वार्थीअगाधजाण॥कृष्णकीर्तीकविताजाण॥परमपावनतिहींलोकीं॥४
१॥कवीश्वराचीकृष्णकीर्ती॥ऐकतांवाढेश्रद्धाप्रीती॥तेणेंथोरावेकृष्णभक्ती॥हेकविताशक्तीअगाध॥४२॥ऐशीअगाधकृष्णकीर्ती॥मा
त्याकृष्णाचीकृष्णमूर्ती॥जेअखंडध्यानीदेखती॥तेतेंहोतीतद्रूप॥४३॥ज्यासिध्यानींकृष्णमूर्ती॥तेतेंतद्रूपतापावती॥हेंनवलन
व्हेकृष्णस्थिती॥जेद्वेषेंदेखतीतेहिमुक्त॥४४॥ज्याचेरथींमेघःशाम॥सारथीझालापुरुषोत्तम॥यालागींपार्थाचापराक्रम॥मिर
वीनामविजयत्वें॥४५॥सदांजयसंपूर्णु॥यालागींअर्जुनानामजिष्णू॥ज्याचेयुद्धींचापणकठिणु॥सिद्धीश्रीकृष्णुपाववी॥४६॥तेंबै
सोनिअर्जुनाचेरथीं॥विचरतांयुद्धक्षिती॥जेजेंदेखतीकृष्णमूर्ती॥तेतेंकृष्णस्थितीपावले॥४७॥जेथकृष्णाचापडेपदरेणु॥तेथेंचहू
मुक्तीसीहोयसणू॥ऐशीपावनश्रीकृष्णतनू॥कैसेंनिश्रीकृष्णुसांडिताझाला॥४८॥ह्मणालब्रह्मशापाभेण॥शरीरसांडीश्रीकृष्ण॥हेंबो
लविअप्रमाण॥कृष्णब्रह्मपूर्णपरमात्मा॥४९॥हेळणछळणदुर्वचन॥द्विजांनकरावाअपमान॥त्यांचावादवावापूर्णसन्मान॥
तनुत्यागेंश्रीकृष्णद्विजशापपाळी॥५०॥कृष्णपरमात्मापरिपूर्ण॥तेणेंहिनिजकुळनिर्दळन॥सत्यकरीब्राह्मणवचन॥विप्रशापेंआप
णनिजतनूत्यागी॥५१॥तोतनुत्यागप्रकार॥सांगसमूळसविस्तर॥सांगताहेशुकयोगेंद्र॥परिसेनरेंद्रत्यक्तोदक॥५२॥पांडवकुळीं

कुळदीपक ॥ जन्मला परिक्षिती चि एक ॥ जो हा ऊनिख्यकंदक ॥ भागवत परिपाक सेवित ॥ ५३ ॥ अज्ञाना रदव्यासपर्यंत ॥ भागवत उपदेश गु
ह्य गुप्त ॥ तें परिक्षितीनें जगाआंत ॥ केला प्रगटार्थ दीनोद्धारा ॥ ५४ ॥ धर्मवंशी अतिधार्मिक ॥ जन्मला परिक्षिती चि एक ॥ भागवतरसीं अ
तिरसिक ॥ अतिनेटकश्रवणार्थी ॥ ५५ ॥ ऐसा जो कां परिक्षिती ॥ तेणें अत्यादरें केली विनंती ॥ शुक सुखावोनि चित्तीं ॥ काय त्याप्रति बो
लिला ॥ ५६ ॥ ॥ श्लोक ॥ ऋषिरुवाच ॥ दिविभुव्यंतरिक्षे च महोत्पातान्समुत्थितान् ॥ दृष्ट्वासीनान्सुधर्मायां कृष्णः प्राह यदूनि
दं ॥ ५ ॥ ॥ टीका ॥ शुक ह्मणे परिक्षिती ॥ उद्धव गेलिया वनाप्रती ॥ मागें विघ्नभूत द्वारावती ॥ त्रिविध उत्पात अतिव्याप्त ॥ ५७ ॥ दिविभु
वि अंतरिक्षगत ॥ उठिले गा महाउत्पात ॥ दिवसा उल्कापात होत ॥ भूतें खाकात अंतरिक्षीं ॥ ५८ ॥ गगनीं उगवले त्रिविध केतु ॥ दंडकेतु धू
मकेतु ॥ शिखाकेतु अतिअद्भुतु ॥ दिवसाहि दिसतु सर्वांसी ॥ ५९ ॥ धरा कांपोनि अतिगजरीं ॥ भूस्फोट झाला नगरद्वारीं ॥ भूकं
पतीन दिवसवरी ॥ घरोघरीं आंदोळ ॥ ६० ॥ नारा सुटला झंझाडें ॥ समूळ उन्मळोनि झाडें ॥ द्वारकेमाजी धुळिवडे ॥ डोळां नुघडे जग्
चा ॥ ६१ ॥ अंतरिक्षींच रामुतें ॥ धांवतीं खाकांतीं गिंवकातें ॥ रुधिरवृष्टि होय तेथें ॥ अकस्मातीं निशार्ध्रीं ॥ ६२ ॥ रविचंद्राचें मंडळ ॥ ख
ळें करी तरा सार्वकाळ ॥ ग्रहभेदिती ग्रहमंडळ ॥ क्रूरग्रह मंद शत्रुसदनीं ॥ ६३ ॥ सन्मुख आकाशाचे पोटीं ॥ दिग्दाह देखती दृष्टी ॥
अग्निबाण कडकडाटी ॥ पडती वितंडी महाग्निज्वाळा ॥ ६४ ॥ धारीं झडपिती सत्राणें ॥ जे वितां पुढील नेती प्राणें ॥ दिवसा दिवाभीत पुं
गाणें ॥ राजद्वारीं श्वासें से घर रडत ॥ ६५ ॥ बैसन्यासुधर्मा सभेप्रती ॥ संकल्पविकल्पाची निवृत्ती ॥ ते सभेसी वीर बोसणती ॥ मारी
मारा ह्मणत परस्परें ॥ ६६ ॥ तें एकतां निरुत्तर ॥ दचकत महाशूर ॥ सुधर्मा सभेसी चिंतातुर ॥ यादववीर समस्त ॥ ६७ ॥ यादव बैसले
सभेसी ॥ छाया देखत विणशिसीं ॥ सुधर्मा धर्मसभे पासीं ॥ अरिष्टें ऐशीं उठती ॥ ६८ ॥ ऐशीं अरिष्टें अनिवार ॥ दुःखसूचकें दुस्तर ॥
देखोनि यादववीर थोर ॥ विघ्नविचार विवंचिती ॥ ६९ ॥ द्वारकेचें विघ्न निर्दळण ॥ करूं ठेविलें सेसुदर्शन ॥ ते द्वारकेमाजी महाविघ्न

कायकारणउठवया॥७०॥जंवपातयापातेंलवे॥तंवचक्रएकवीसवेढेभंवे॥तेंद्वारकेसीविघ्नसंभवे॥देखोनिआघवेंअतिचकित॥७१॥सर्वांवि
घातेंआकर्षण॥करियानावस्मणिपेंकृष्ण॥तोकृष्णायेथेंअसतांजाण॥उत्पातदारुणकांउठती॥७२॥एवंविचारारूढयादवांसी॥चिंतातु
रदेखोनियांत्यांसी॥बुद्धिसांगावयात्यापासी॥कायहृषीकेशीबोलत॥७३॥ ॥श्रीभगवानुवाच॥एतेघोरामहोत्पाताद्वारवत्यांयमकेतवः
॥मुहूर्तमपिनस्थेयमत्रनोयदुपुंगवाः॥५॥ ॥टीका॥जोजगाचासूत्रधारी॥जोमायायंत्रींचायंत्रकारी॥तोयादवाप्रतीश्रीहरी॥आलोचकरी
निघाचा॥७४॥यादवकुळांसीआलाप्रांत॥हेंजाणेश्रीकृष्णनाथ॥यांचाद्वारकेसीहोऊंनयेघात॥यालागींसमस्तप्रभासाधाडी॥७५॥द्वा
रावतीसातवीपुरी॥येथीलमरणमोक्षोपकारी॥यादवसमस्तदेवाधिकारी॥यालागिंतेबाहेरीश्रीकृष्णकाढी॥७६॥कुळनाशाचेंमूळदेख
प्रभासेंनिघाळीसेयेरिक॥हानिकृष्णाचाहीआवांका॥तोधाडीसकळिकांप्रभासेंसी॥७७॥यादवांसीब्रह्मशाप॥घडलासेघोररूप॥या
लागिंद्वारकेमाजीसंताप॥उत्पातरूपेंउठती॥७८॥उत्पातउठलेअनेक॥हेअनिवारअरिष्टसूचक॥अविलंबेंतत्काळिक॥परमदुःखपावला॥
७९॥यालागिंतुम्हीअवश्यक॥येथेंराहावेनामुहूर्तयेक॥स्त्रियापुत्रसकळदळलोक॥तत्काळिकनिघावें॥८०॥म्हणालयादववीरउद्भट॥आ
म्हासिकायकरीलअरिष्ट॥येणेंगर्वेंअतिअनिष्ट॥परमकष्टपावाल॥८१॥ब्राह्मणाचेशापापुढें॥कायसेंशौर्यबापुडें॥तुम्हीनविचारितांमागें
पुढें॥आतांचिरांकडेंनिघावें॥८२॥द्वारकेमाजीआजीकोणी॥सर्वथापिऊंनयेपाणी॥स्त्रीपुत्रसकळदजनी॥परिवारोनिनिघावें॥८३॥कुळासि
घडलाब्रह्मशाप॥तेणेंद्वारकेसिउठिलासंताप॥तेंफेडावयाकुळाचेंपाप॥क्षेत्रपुण्यरूपप्रभासा॥८४॥ ॥श्लोक॥स्त्रियोबालाश्चवृद्धाश्च
शंखोद्धारंव्रजंत्वितः॥वयंप्रभासंयास्यामोयत्रप्रत्यक्सरस्वती॥६॥ ॥टीका॥वस्तीसिअतिगूढशंखोद्धार॥तेथेंठेवावीस्त्रीवृद्धकु
मार॥आम्हीसमस्तयादववीर॥निघावेंसत्वरप्रभासेंसी॥८५॥जेथेंप्राचीसरस्वती॥मिळालीअसेसागराप्रती॥तेथेंजाऊनिसमस्तीं॥क
रावेंविध्युक्तविधिविधान॥८६॥ ॥श्लोक॥तत्राभिषिच्यशुचयउपोष्यसुसमाहिताः॥देवताःपूजयिष्यामःस्नपनालेपनार्हणैः॥७॥

टीका ॥ तेथें वेदोक्तविधान ॥ करावें तीर्थीं तीर्थस्नान ॥ तीर्थविधियुक्त उपोषण ॥ करावें आपण निराहार ॥ ८७ ॥ तेथ सद्भावें शुचिर्भूत ॥ राहोनि निवा
समस्त ॥ तीर्थदेवताविधियुक्त ॥ निधापार्थ पूजावी ॥ ८८ ॥ स्नान वस्त्र अलंकार ॥ चंदनादि पूजासंभार ॥ समर्पूनि षोडशोपचार ॥ श्रद्धा हरिहि
र पूजावा ॥ ८९ ॥ ॥ श्लोक ॥ ब्राह्मणांस्तु महाभागान्कृतस्वस्त्ययनावयं ॥ गोभूहिरण्यवासोभिर्गजाश्वरथवेश्मभिः ॥ ८ ॥ ॥ टी०
वेदवेदांगपारंगत ॥ शमदमादि तपयुक्त ॥ ब्राह्मण जे स्वधर्मनिरत ॥ विघ्नशांत्यर्थ पूजावे ॥ ९० ॥ व्हावया अरिष्टनिरशन ॥ करितां शांत्यर्थ
स्वस्तिवचन ॥ त्यां ब्राह्मणांसी आपण ॥ द्यावें दान श्रद्धायुक्त ॥ ९१ ॥ गोदान भूदान गजदान ॥ अश्वदान सुवर्णदान ॥ तिळदान वस्त्रदान ॥
द्यावें गृहदान अतिश्रद्धा ॥ ९२ ॥ रथीं संजोगोनि असिवार ॥ दान द्यावें रहंवर ॥ द्विज सुखी होती अपार ॥ तो तो प्रकार करावा ॥ ९३ ॥ जे जे
ब्राह्मणा अपेक्षित ॥ तें तें द्यावें श्रद्धायुक्त ॥ ब्राह्मण तुष्टमान येथ ॥ अरिष्ट तेथ रिगेना ॥ ९४ ॥ ॥ श्लोक ॥ विधिरेष ह्यरिष्टघ्नो मंगलायन
मुत्तमं ॥ देवद्विजगवां पूजा भूतेषु परमो भवः ॥ ९ ॥ ॥ टीका ॥ जेथें हरीचें देवतार्चन ॥ जेथ शाळिग्रामशिळार्चन ॥ जेथ साधुसंतांस न्मा
न ॥ ते अरिष्टनाशन महापूजा ॥ ९५ ॥ जेथ सद्भावें द्विजपूजन ॥ जेथ भावार्थें गोसंरक्षण ॥ जेथ भूतदयासंपूर्ण ॥ तेथ कदां विघ्न रिगेना ॥
९६ ॥ अंधपंगू अशक्तजन ॥ जेथ पावती अवश्य अन्न ॥ जेथ सुखी होती दीन ॥ नेथ कदां विघ्नबाधी ना ॥ ९७ ॥ जेथ भूतदया अलौकिक ॥ ते सक
ळ अरिष्टछेदक ॥ परम मंगळप्रकाशक ॥ सुखदायक सर्वार्थीं ॥ ९८ ॥ ॥ श्लोक ॥ इति सर्वे समाकर्ण्य यदुवृद्धा मधुद्विषः ॥ तथेति नौभि
रुत्तीर्य प्रभासं प्रययू रथैः ॥ १० ॥ ॥ टीका ॥ जो मधुकैटभमर्दन ॥ जो मुरारी मधुसूदन ॥ जो परमात्मा श्रीकृष्ण ॥ तो करी प्रेरण प्रभासे ॥
९९ ॥ यादवांमाजी वृद्ध सज्ञान ॥ पुत्रमित्र सुहृदजन ॥ तिहीं श्रीकृष्णाचें वचन ॥ बहुसन्मानें वंदिलें ॥ १०० ॥ सकळ यादवसंभारा ॥ स्त्रि
या वृद्ध आदि बाळकुमरा ॥ नावा भरोनियां समग्रा ॥ शंखोद्धारा न्याहाळणती ॥ १ ॥ पालखणो निरथ कुंजर ॥ चातुरंग सेनासंभार ॥ कृष्णासहि
त यादववीर ॥ निघाले समग्र प्रभासासी ॥ २ ॥ ॥ श्लोक ॥ तस्मिन्भगवतादिष्टं यदुदेवेन यादवाः ॥ चक्रुः परमया भक्त्या सर्व

श्रेयोपबृंहितं ॥ ११ ॥ ॥ टीका ॥ यादव प्रभासा पावोन ॥ जें संहातें श्रीकृष्णवचन ॥ त्याहूनि विशेषें जाण ॥ स्नानदान तिहीं केलें ॥ ३ ॥ या अ ३०
दवसमस्त मिळोन ॥ केलें पारणाविधि भोजन ॥ मग महामद्य आणूनि जाण ॥ तेथें मद्यपान मांडिलें ॥ ४ ॥ ॥ श्लोक ॥ ततस्तस्मिन्महा
पानं पपुर्मैरेयकं मधु ॥ दिष्टविभ्रंशितधियो यद्द्रवैर्भ्रश्यते मतिः ॥ १२ ॥ ॥ टीका ॥ करूनियां तीर्थविधान ॥ करावें अरिष्टनिरशन ॥ बा
प अरिष्टाचें विंदाण ॥ तेथें मद्यपान मांडिलें ॥ ५ ॥ ज्याची गोडपणें पडे मिठी ॥ उन्मादता अतिशयें उठी ॥ तें मद्यपान उठाउठी ॥ वडिल धा
कुटीं मांडिलें ॥ ६ ॥ ज्याचा वास येतां घ्राणीं ॥ उन्माद चढे तत्क्षणीं ॥ तैसिया मद्याचें मद्यपानीं ॥ वीरश्रेणी बैसल्या ॥ ७ ॥ मैरेय कमद्या
ची थोरी ॥ मधुरता अतिशयें भारी ॥ लागतां चि जिव्हे वरी ॥ भ्रांत करी सज्ञाना ॥ ८ ॥ तें मद्यपान यादवां वरी ॥ आदरिलें स्वेच्छाचारी ॥
आग्रह करूनि परस्परीं ॥ लहानथोरीं मांडिलें ॥ ९ ॥ ॥ श्लोक ॥ महापानाभिमत्तानां वीराणां दृप्तचेतसां ॥ कृष्णमायाविमूढानां सं
घर्षः सुमहानभूत् ॥ १३ ॥ ॥ टीका ॥ पूर्वी अतिमित्र पोटांत ॥ ते मद्यपानें झाले मत्त ॥ वीरमातले अतिदृप्त ॥ नोकूनि बोलत परस्परें ॥ १०
॥ कृष्णमाया हरिला बोध ॥ अवघे झाले बुद्धिमंद ॥ सांडूनि सुहृद संबंध ॥ निर्वाण युद्ध मांडलें ॥ ११ ॥ नोकूनि बोलतां विरुद्ध ॥ अतिशयें च
ढला क्रोध ॥ शस्त्रें घेऊनि सन्नद्ध ॥ सुहृदां युद्ध मांडिलें ॥ १२ ॥ ॥ श्लोक ॥ युयुधुः क्रोधसंरब्धा वेलायामाततायिनः ॥ धनुर्भिरसि-
भिर्भल्लैर्गदाभिस्तोमरर्ष्टिभिः ॥ १४ ॥ ॥ टीका ॥ क्रोधें नेत्र रक्तांबर ॥ वेगें वादूनि हाणिती थोर ॥ समुद्रतीरीं महावीर ॥ यु घोरांदरंक-
रिती ॥ १५ ॥ धनुष्यें बाउनियां जाणा ॥ बाण सोडिती सणसणा ॥ खगें हाणती खणखणा ॥ सुहृदांच्या प्राणाघ्यावया ॥ ४ ॥ एकीं उव
लोनियां माळे ॥ परस्परें हाणते झाले ॥ येकीं गदा उचलोनि बळें ॥ वीर करनळें पाडिले ॥ १५ ॥ एक तोमरें लवल्लाहीं ॥ रणीं खवळले भीडती
पाहीं ॥ एक तोणप्याचा घाई ॥ वीर नार्थीपाडिले ॥ १६ ॥ यापरी चातुरंगसेना ॥ मिसळल्या रणकंदना ॥ आपुलालिया आंगवणा ॥ गज
रथ रणा आणिलें ॥ १७ ॥ ॥ श्लोक ॥ पतत्पताकै रथकुंजरादिभिः खरोष्ट्रगोभिर्महिषैर्नरैरपि ॥ मिथः समेत्याश्वतरैः सुदुर्मदान्य

हन्यशरेर्दंद्रिरिवाद्विशावने॥१५॥ ॥टीका॥ पताकांसिरथकुंजर॥ रणीं पाडिले अपार॥ पारखरांसि अभिवार॥ मारिले स्वरांष्ट्रू रणामाजी॥१८॥ ऐसे संमारून यांरणीं॥ पाडिले याची रश्रेणी॥ जैसे उन्मत्त गजवनीं॥ दंतीं स्वणाणी मीडन॥१९॥ यापरी यादव वीर॥ रणीं मातले महाशूर॥ घायमारोनि निष्टूर॥ रणीं अपार पाडिले॥२०॥ कृष्णमायाकेलें भ्रांत॥ युद्धीं निंद स्वतां स्वार्थ॥ परस्परें प्राणघात॥ व्यर्थ करित कृत्दांचा॥२१॥ रणपडिलें अपार॥ तंव खवळलें कृष्णकुमर॥ त्यात्यांमाजी प्रीति थोर॥ ते युद्धातुर चालिले॥२२॥ ॥श्लोक॥ प्रद्युम्न सांबो युधि रूढमत्सरावक्रूरभोजावनिरुद्धसात्यकी॥ सुभद्रसंग्रामजितौ सुदारुणौ गदौ सुमित्रासुरथौ समीयतुः॥१६॥ ॥टीका॥ त्याज्यामाजी अतिप्रीती॥ ते तें निर्वाण युद्ध करिती॥ बापसंह्मारक काळगती॥ सरवें मारिती सख्यातें॥२३॥ प्रद्युम्न सांब अति मित्र॥ त्यांस युद्ध मांडलें घोरांदर॥ अक्रूर भोज दोन्ही वीर॥ युद्धीं सत्वर मिसळले॥२४॥ अनिरुद्ध आणी सात्यकी॥ उग्रवळें क्रोधन वंकी॥ बाणी वर्षोनि अनेकीं॥ एकमेकां गांजिती॥२५॥ सुभद्र संग्रामजीत दोनी॥ खवळले रणांगणी॥ वर्षोनियांतीक्ष्ण बाणी॥ उन्मत्त रणीं मातले॥२६॥ कृष्णपुत्र कृष्णबंधु॥ दोहींचें हि नाम गद॥ त्यांसि रामत्सर क्रोधु॥ युद्धसंबंधु परस्परें॥२७॥ सुमित्र आणि सुरथ॥ या दोहींसि द्वेष अद्भुत॥ परस्परें करावया घात॥ युद्धा आंत मिसळले॥२८॥ ॥श्लोक॥ अन्ये च ये वै निशठोल्मुकादयः सहस्रजिच्छतजिद्भानुमुख्याः॥ अन्योन्यमासाद्य मदांधकारिता जघ्नुर्मुकुंदेन विमोहिता भृशं॥१७॥ ॥टीका॥ यादवकुळीं बळ अधिक॥ निकट दिसुल्मुकादिक॥ शतजित्सहस्रजिद्भानुमुख्य॥ हे हि युद्धीं देख खवळले॥२९॥ मद्यपानें अतिगर्वित॥ कृष्णमाया हरिलें चित्त॥ महामोहें केलें भ्रांत॥ सुहृदाघात स्वयें करिती॥३०॥ ब्रह्मशापाचें केवढी ख्याती॥ बंधु बंधूतें जिवें घेती॥ कृष्णमाया पडिले भ्रांती॥ युद्ध स्वयातें मांडारी॥३१॥ ॥श्लोक॥ दाशार्हवृष्ण्यंधकभोजसात्वता मध्वर्बुदा माथुरशूरसेनाः॥ विसर्जनाः कुकुराः कुंतयश्च मिथस्ततस्तेऽथ विसृज्य सौहृदं॥१८॥ ॥टीका॥ यादवांचा एक जाती॥ तेचि यारा नामें नामांकिती॥ त्या वारा हि न्याती यु

द्रौपदीइती॥ ऐकपरिक्षितीतींनामें॥ ३२॥ दाशार्हसात्वतअंधकजाण॥ अर्बुदमाथूरशूरसेन॥ कुंतीकुकुरविसर्जन॥ मधुभोजवृष्णबा
रानामें॥ ३३॥ पूर्वीलयादवांचेंसाजणें॥ त्यातीनेंअल्पहीऐकतांउणें॥ जीवेंसिसर्वस्ववेंचणें॥ परिवांचवणेंत्यांती॥ ३४॥ तेचिया
दवपैंगाआनां॥ सांडोनियांसुहृदता॥ ज्याचेचरणीठेविजेमाथा॥ त्यांच्याजीवघातापेटले॥ ३५॥ ॥श्लोक॥ पुत्राअयुध्यन्पि
तृभिर्भ्रातृभिश्चस्वस्रीयदौहित्रपितृव्यमातुलैः॥ मित्राणिमित्रैः सुहृदः सुहृद्भिर्ज्ञातींस्त्वहन्ज्ञातयएवमूढाः॥ १९॥ ॥टीका॥ कृष्ण
मायाआकळिलेंचित्त॥ अवघेपरमाप्तांत॥ नकळेआपअनाप्त॥ रणींउन्मत्तमातले॥ ३६॥ ज्याचेचरणवंदिजेमावार्था॥ श्राघेइजेच
रणतीर्था॥ त्यानिजपित्याचियामाथां॥ पुत्रशस्त्रघातप्रवर्तले॥ ३७॥ बंधूशिरकल्यारणांगणीं॥ बंधुबंधुतेंसोडवीनिर्वाणी॥
तेचिबंधुबंधूतेरणीं॥ निर्वाणबाणीरवोंचिती॥ ३८॥ जोलळेपुरऊनिरवेळविना॥ जेसाबापतेसाचुलता॥ त्यासिपुतण्याप्रवर्तेघा
ता॥ शस्त्रेंमाथांहाणोनी॥ ३९॥ कन्येचासुतदौहित्र॥ ज्यासिआईअधिकार॥ तोआजासिकरीमार॥ घायनिष्ठुरहाणोनी॥ ४०॥
मामभाचेपरस्परीं॥ प्रवर्तलेमहामारी॥ सुहृदसुहृदांच्याशिरीं॥ संतेजशस्त्रेंहाणती॥ ४१॥ मित्रमित्राच्याभिन्नता॥ वेंचितीअर्थ
जीविता॥ तेमित्रमित्राच्याजीवघाता॥ सक्रोधनाउठिले॥ ४२॥ आयुष्यसरलेंनिःशेख॥ चढलेंकाळसर्पाचेंविख॥ अवघेहोऊनि
यांमूर्ख॥ ज्ञातीज्ञातीदेरववधितेंझाले॥ ४३॥ ॥श्लोक॥ शरेषुक्षीयमाणेषुभज्यमानेषुधन्वसु॥ शस्त्रेषुक्षीयमाणेषुमुष्टिभि
र्जह्रुरेरकाः॥ २०॥ ॥टीका॥ युद्धमांडलेंघोरांदर॥ सरलेभातडींचेशर॥ धनुष्यदंडेंपरस्पर॥ घायेंनिष्ठुरहाणती॥ ४४॥ घायहां
णतांअतिबळें॥ धनुष्येंमोडलींतत्काळें॥ क्षीणझालींशस्त्रेंसकळें॥ हातियेरबळेंखुंटलीं॥ ४५॥ ब्रह्मशापाचीयेरिका॥ तिरीं
निघालीहोतीदेखा॥ मुष्टीघेऊनिक्रोधतवका॥ एकमेकाहाणाती॥ ४६॥ ॥श्लोक॥ तावज्रकल्पात्यभवन्परिघामुष्टिना-
मृताः॥ जघ्नुर्द्विषस्तैः कृष्णोनवार्यमाणास्तुतंचते॥ २१॥ ॥टी० तेयेरिकाघेतांचिहातीं॥ झालीवज्रप्रायधगधगिती॥ अग्नितो

स्त्रपरिघाकृती ॥ तेणें हाणती परस्परें ॥ ४७ ॥ नाना शस्त्रें लागतां पाहीं ॥ यादव न चुंकती कदाही ॥ तेही येरिकेचा घाई ॥ पडती ठायीं अचेतन ॥ ४८ ॥ येरिकेंचा निज घाई ॥ यादवांसी उरी नाहीं ॥ दूध द्वंद्व निर्यापाहीं ॥ पडती ठायीं परस्परें ४९. रणीं पाडिले यांइतर ॥ यादव उरले महाशूर ॥ जेकां नेटकें जुंझार ॥ निधडे वीर निजयांडे ॥ ५० ॥ यादव क्षत्र मदें जाती ॥ हें कोणा रानाटां गती ॥ न्यानिंद्य जन्यां निश्चिती ॥ निवारणा थोर हरि थोनें ॥ ५१ ॥ तो ह्मणे ब्रह्मशापाचें येरिका ॥ हें सर्वथा हातीं धरून का ॥ सांडा पृथ्वीचा आनांका ॥ शिकविलें एकानुह्मी माझें ॥ ५२ ॥ धर्मंता निवारी श्रीकृष्णा ॥ त्यासि हा मारूं अंबलें जाण ॥ हें कृष्णमायेचें विंदाण ॥ न चुकत मरणें आलें ॥ ५३ ॥ एक ह्मणती श्रीकृष्णासी ॥ आधीं झाडोनि पाडायासी ॥ ठकूं आलां आह्मासी ॥ ह्मणोनि येरिकेसी धांविन्नले ॥ ५४ ॥ एक ह्मणती धरा केशीं ॥ येक ह्मणती मीडका वसी ॥ येक ह्मणे मारा श्रीकृष्णासी ॥ एकाघायें सीन्मोकळ न ॥ ५५ ॥ ॥ श्लोक ॥ मन्यते कंमन्यमानानां बलभद्रंचमोहिताः ॥ हंतुंकृतधियोराजन्नापन्नाआततायिनः ॥ २२ ॥ ॥ टीका ॥ पैलपैल तो बळिभद्र ॥ हा निआमुचा मुख्य शत्रू ॥ यासि चला आधि मारूं ॥ यादवमारू लोटला ॥ ५६ ॥ मदमोहें अतिदुर्मती ॥ वज्रमाय येरिका हातीं ॥ घेऊनि बळिभद्रा नर रायेतो ॥ तेणे तोही निश्चिती क्षोभला ॥ ५७ ॥ ॥ श्लोक ॥ अथतावपिसंक्रुद्धावुद्यम्यकुरुनंदन ॥ एरकामुष्टिपरिघौचरंतौजघ्नतुर्युधि ॥ २३ ॥ ॥ टीका ॥ शुक ह्मणें कुरुनंदना ॥ यादवें केलें आत्ममरणा ॥ तें मारावया रामकृष्णा ॥ ठाकले जाण आततायी ॥ ५८ ॥ यादव उठले हननासी ॥ देखूनि राम हृषीकेशी ॥ अतिक्रोध चढला यांसी ॥ तेही युद्धासी मिसळले ॥ ५९ ॥ येरिका जे कांपरिघाकृती ॥ वज्रमाय धगधगिती ॥ दोघे जण घेऊनि हातीं ॥ यादवां स्याती लाविली ॥ ६० ॥ रामकृष्णाच्या निजस्याती ॥ यादवांचा जाती व्यक्ती ॥ अवघे निरणा येती ॥ कृष्णाकाळ शक्ती क्षोभला ॥ ६१ ॥ निजकुळाचें निधन ॥ देखोनि यांश्रीकृष्ण ॥ कर्तव्यार्थ झाला पूर्ण ॥ ऐसें संपूर्ण मानिलें ॥ ६२ ॥ ॥ श्लोक ॥ ब्रह्मशापोपसृष्टानांकृष्णमायावृतात्मनां ॥ स्पर्धाक्रोधःक्षयंनिन्येवैणवोऽग्निर्यथावनं ॥ २४ ॥ ॥ टीका ॥ ब्रह्मशापें छळिले विधी ॥ कृष्णमायाकुलित

बुद्धी॥मद्यपानउन्मादमदीं॥क्रोधेंनिशुद्धीक्षयानेले॥६३॥वेळुवाचीवेकुजाळी॥जेविंकांचणीपडेदंगळीं॥तेणेंवनाचीहोयहोळी॥तेंवि
यदुकुळींकुलक्षयो॥६४॥ ॥श्लोक॥एवंनष्टेषुसर्वेषुकुलेषुस्वेषुकेशवः॥अवतारितोभुवोभारइतिमेनेऽवशेषितः॥२५॥ ॥टीका॥
स्वकुळनाशूनिश्रीधर॥अवशेषधराभार॥उतरलामानीचक्रधर॥तेणेंसुखेंथोरसुखावे॥६५॥जेविंकांआलेंपेरिमाळी॥निजजीवें
नेंप्रतिपाळी॥शेखींतोचिखुडोसमुळीं॥तेंवियदुकुळींश्रीकृष्ण॥६६॥यादवनिजबळेंप्रतिपाळी॥त्यातेस्वयेंनिजांगेंनिर्दळी॥हेंदाख-
विनांवनमाळी॥ममतामेळीं अलिप्त॥६७॥कृष्णापाळीयादवांसमस्तां॥त्याचीदाविली अतिममता॥शेखींकरूनिकुळाचेंघाता।
निराभिमानीहरीदावी॥६८॥स्त्रीपुत्रेंसिनिजजीविता॥सकळकुळांच्याहोतांघाता॥ज्ञात्यासिनुपजेममता। तेंनित्यमुक्ततांह
रिदावी॥६९॥ज्ञात्यासिनाहीं अहंममता॥तेंचिदावावयातत्वतां॥कुळेंशिहोतांपुत्रघाता।स्वमींहिज्ञाताग्लानिनेणे॥७०॥ब्रा
ह्मणाचाशापदारुण॥अन्यथाहोनेंदीश्रीकृष्ण॥निजकुळनिर्दळी आपण॥निप्रवचनसत्यत्वा॥७१॥करूनिकुळक्षयाचेंकाम॥
सुखमानीपुरुषोत्तम॥तेंदेखोनिह्मणेबळिराम॥अवतारकामसंपलें॥७२॥ ॥श्लोक॥रामःसमुद्रवेलायांयोगमास्थायपौ
रुषं॥तत्याजलोकंमानुष्यंसंयोज्यात्मानमात्मनि॥२६॥ ॥टीका॥मगबळिभद्रेंआपण॥समुद्रतीरीं योगासन॥दृढघालोनि
यांजाण॥निर्वाणध्यानमांडिलें॥७३॥आकर्षूनिदेहिंचाप्राण॥निःशेषसांडिलादेहाभिमान॥मगपरमपुरुषध्यान॥करितां
चिआपणतद्रूपझाला॥७४॥जेविंघटामाजीलगगन॥सहजेंमहदाकाशपूर्ण॥तेंविसांडितांदेहाभिमान॥झालासंकर्षणबळि
राम॥७५॥होतेंमनुष्यनाट्यअवलंबिलें॥तेंनिःशेषदेहत्यागिलें॥जेंकांपूर्वरूपआपुलें॥तेंहोऊनिठेलेंबळिराम॥७६॥समुद्र
तीरींयोगासन॥तेंदेहठेविलेंअचेतन॥हेंरामनिर्वाणदेखोन॥स्वयेंश्रीकृष्णासरसावला॥७७॥ ॥श्लोक॥रामनिर्याणमालोक्यभ ६
गवान्देवकीसुतः॥निषसादधरोपस्थेतूष्णीमासाद्यपिप्पलं॥२७॥ ॥टीका॥बळिभद्रझालादेहातीत॥हेंदेखोनिदेवकीसुत॥

भगवान श्रीकृष्णनाथ ॥ स्वयें उठिला निजधाम ॥ ७८ ॥ तेव्हां धगतळीं धगधर ॥ मौनें अश्वत्थातळीं स्थिर ॥ वीरासनीं शारंगधर ॥ श्यामसुं
दर बैसला ॥ ७९ ॥ ज्याचा स्वरूपाचें आवडी ॥ शिवविरिंच्यादि ध्यानीं निरंत ॥ त्याच्या दर्शनाची गोडी ॥ सर्व लोकांसी क्षणार्ध ॥ ८० ॥ दृष्टीनें
चवी चाखिली गाढी ॥ तंव तंव रसनाचें स्फुरे ॥ तेणें तेंतें नरसें रसगोडी ॥ सर्व लोकांचें चाखिलें ॥ ८१ ॥ प्राशनें वीण कृष्णरस ॥ रसनासे
वी अतिसुरस ॥ तेव्हां विषयरसतो निरस ॥ होय नीरस संसार ॥ ८२ ॥ श्रवणीं पडतां कृष्णकीर्ती ॥ त्रिविधताप उपशांती ॥ ज्याचे वर्णितां गुण
नाम स्थिती ॥ चारी मुक्ती कामाच्या ॥ ८३ ॥ चरणकमळमकरंद ॥ तुळसी मिश्रित अमोद ॥ सेवितां घ्राणीं परमानंद ॥ इतर गंध तें तुच्छ ॥ ८४
ज्याचा लागतां अंगसंग ॥ देहबुद्धीचा होय भंग ॥ स्वानंदें विचरे श्रीरंग ॥ अंगप्रत्यंग सुखकारी ॥ ८५ ॥ ज्याचें आवडी वंदितां पाये ॥ समाधीला
जिल्ही मागें ठाये ॥ तो अश्वत्थातळीं पाहें ॥ बैसला आहे निजशोभा ॥ ८६ ॥ तें अंतकाळीचें कृष्णध्यान ॥ शुकाशी आठवलें संपूर्ण ॥ तो हि स्वा
नंदें बोलिला संपूर्ण ॥ श्रीकृष्णध्यान वर्णित ॥ ८७ ॥ ॥ श्लोक ॥ बिभ्रच्चतुर्भुजं रूपं भ्राजिष्णु प्रभया स्वया ॥ दिशो वितिमिराः कुर्वन्विधूम इव पाव
कः ॥ २८ ॥ ॥ टीका ॥ पांचांचें श्रीकृष्णध्यान ॥ पांचा श्लोकीं निरूपण ॥ श्रोता परिक्षिती सावधान ॥ वक्ता ज्ञानघन शुकयोगेंद्र ॥ ८८
पिंपळातळीं प्रकाशघन ॥ ते काळींची मूर्ती जाण ॥ निजतेजें देदीप्यमान ॥ दिशा परिपूर्ण तेणें तेजें ॥ ८९ ॥ नाधूमना इंगळ ॥ आरक्त तें वीण-
अग्निज्वाळ ॥ तैसी कृष्णमूर्ति निर्जाळ ॥ प्रकाश प्रबळ अतिदीप्ती ॥ ९० ॥ कृष्णमूर्तीचें निजप्रभा ॥ लोपली रविचंद्राची शोभा ॥ शू
न्यत्व ठाव नाहीं नभा ॥ सच्चिदाभासाकार ॥ ९१ ॥ चैतन्य तेजें मुसावलें ॥ शांतिरसाचें ओतिलें ॥ चतुर्भुज बैं रूपा आलें ॥ तेणें दिशां
चें गेलें काळिमा ॥ ९२ ॥ ॥ श्लोक ॥ श्रीवत्सांकं घनश्यामं तप्तहाटकवर्चसं ॥ कौशेयांबरयुग्मेन परिवीतं सुमंगलं ॥ २९ ॥ सुंदरस्मि
तवक्त्राब्जं नीलकुंतलमंडितं ॥ पुंडरीकाभिरामाक्षं स्फुरन्मकरकुंडलं ॥ ३० ॥ ॥ टीका ॥ कृष्णमूर्ति स्वच्छ स्वयंभ ॥ आंगीं प्रत्यांगीं विवळे न
भ ॥ तेणें घनःशाम मनःशोभ ॥ अतिसभ्रम साजिरी ॥ ९३ ॥ आधींच नेटका श्रीकृष्ण ॥ वरी घनश्यामता वाणिली पूर्ण ॥ तेणें मुसावलें वर

वेपण ॥ लागलें ध्याननारीनरां ॥ ९४ ॥ नरनारीबापुड्या किती ॥ संन्यासी फळें निठाती ॥ विरक्तपथ ळेपरमायी ॥ दृस्ना नभूनां कृष्णा
ची ॥ ९५ ॥ देखतांश्रीकृष्णादर्शन ॥ शिवासिलागलें निजध्यान ॥ पार्वत्याहिनिजमन ॥ कृष्णार्पणस्वयेंकेलें ॥ ९६ ॥ ऐसें आंगीचें बरवेपण
॥ त्याहिवरीहास्यवदन ॥ साजिरें राजीवलोचन ॥ आकर्णपूर्णसारक्त ॥ ९७ ॥ मस्तकीं नेत्र लालक ॥ सुगंधसुमनांगुंफिलें चोख ॥ कृ
ष्णींकृष्णारूपमधुक ॥ कृष्णाकेशीं देखावि गुंतले ॥ ९८ ॥ स्फुरन्तं कुंडलें मकराकार ॥ ऐसेंवर्णिती कविवर ॥ परितां आकारीं निर्विकार ॥ श्रवणीं
निकारमावळती ॥ ९९ ॥ पावलियाकृष्णाश्रवणा ॥ आकारविकारांचें कवण ॥ तें श्रीकृष्णाअनर्घ्यपूर्ण ॥ विराजमान कुंडलें ॥ २०० ॥ नि
त्यसुवर्णासमान ॥ उभयपीतांबरजाण ॥ एककासेविराजमान ॥ दुजाप्रावर्णशोभत ॥ १ ॥ ब्राह्मणपदें वक्षस्थळी कृष्णा ॥ लक्ष्मीदावक्षनिपूर्ण
दृक्षणांगीविप्रचरण ॥ श्रीवत्सलांछनशोभत ॥ २ ॥ ॥ श्लोक ॥ कटिसूत्रब्रह्मसूत्रकिरीटकटकांगदैः ॥ हारनूपुरमुद्राभिः कौ
स्तुभेनविराजितं ॥ ३१ ॥ वनमालापरीतांगंमूर्तिमद्भिर्निजायुधैः ॥ कृत्वोरौदक्षिणेपादमासीनंपंकजारुणं ॥ ३२ ॥ ॥ टीका ॥
कंठींकौस्तुभसोज्वळा ॥ कटीं मिरवेरत्नमेखळा ॥ ब्रह्मसूत्रकनकगळां ॥ अपादवनमाळाशोभत ॥ ३ ॥ माथामुकुटाचें खेवणें ॥ न
खलखीत अनर्घ्यरत्नें ॥ कीर्तिमुखेंबाहुभूषणें ॥ वीरकंकणीं निचित्रें ॥ ४ ॥ यंत्र उपास्तीउपासका ॥ तें शोभा करांगुळी करमुद्रिका ॥ चिंका
णषट्कोणकर्णिका ॥ जडितमाणिकाशोभती ॥ ५ ॥ वैजयंतीसोहळा ॥ पदकएकावळीगळां ॥ नानारत्नहारमुक्ताफळां ॥ तुळशीमा
ळासुगंधा ॥ ६ ॥ दोनीमांतिलगपदर ॥ रत्नेंजडीतपीतांबर ॥ किंकिणीक्षुद्रघंटाविचित्र ॥ मनोहर शोभती ॥ ७ ॥ वांकी अंदुवांचा ग-
जर ॥ चरणींनूपुरांचा झणत्कार ॥ रुळेंब्रीदांचा तोडर ॥ मनोहर श्रीहरिचरण ॥ ८ ॥ रातोत्पळांकमळपण ॥ त्याहूनिसुकुमारचरण ॥ घ
वघवीतश्रीकृष्णा ॥ शोभासंपूर्णशोभत ॥ ९ ॥ शंखचक्रगदाकमळ ॥ मूर्तिमंत आयुधें ॥ [illegible] ॥ [illegible]
रासनी ॥ १० ॥ त्यानीरासनाचें लक्षण ॥ तळीं सुनीळदक्षणचरण ॥ त्यावेंमांडीवरीजाण ॥ वामचरण अन्नोहित ॥ ११ ॥ ला जयेंनिसं

ध्यारागासी ॥ दुणें आणांनि बाळमृगांसी ॥ चरणशोभा तैसी केशी ॥ अतिदीप्तिसी आरक्त ॥ १२ ॥ ॥ श्लोक ॥ मुशलावशेषायःखंडकृ
तेषुर्लुब्धकोजरा ॥ मृगास्याकारंतच्चरणंविव्याधमृगशंकया ॥ ३३ ॥ ॥ टीका ॥ करूनिनिजकुळाचीहोळी ॥ सरस्वतीतीरींवनमा
ळी ॥ टेंकोनिबैसलापिंपळीं ॥ चरणनिर्वाळीआरक्त ॥ १३ ॥ आरक्तश्रीकृष्णाचरण ॥ भासलेंमृगमुखासमान ॥ जराव्याधेंविंधिलाबाण
अतिसत्राणेंमंत्रिला ॥ १४ ॥ ब्रह्मशापाचेंमुशळघन ॥ यादवींपिष्टकरितांजाण ॥ उरलाअवशेषलोहकण ॥ तोरासमुद्रींजाणटाकिला
१५ ॥ तोपडतांचिसमुद्रजळीं ॥ त्यातेंमीनसगळेंगिळी ॥ त्यामीनातेंजराव्याधेंगळीं ॥ जाळ्यामाजीं आकळिलें ॥ १६ ॥ त्यानेंकरी
मीनविदारण ॥ तंवनिघालातोलोहकण ॥ त्याचाजराव्याधेंकेलाबाण ॥ तेणेंकृष्णाचरणविंधिला ॥ १७ ॥ मत्स्योदरींचालोहघन ॥ त्याचा
केलियाहिबाण ॥ थोरपारधसाधेंसंपूर्ण ॥ त्याधेंजाणोनिनिर्वाणत्याकेला ॥ १८ ॥ तेणेंनयावाकृष्णाचरण ॥ मुळींब्रह्मशापचिकारण ॥ या
लागींजराव्याधाचाबाण ॥ कृष्णाचरणींपूर्णरुतला ॥ १९ ॥ व्याधेंअवचितांविंधिला ॥ परीकृष्णानाहींदचकला ॥ बाणसत्राणेंरुतत
ल्या ॥ तेणेंस्फुरणझालाश्रीकृष्णा ॥ २० ॥ ॥ श्लोक ॥ चतुर्भुजंतंपुरुषंदृष्ट्वासकृतकिल्बिषः ॥ भीतःपपातशिरसापादयोरसुरद्वि
षः ॥ ३४ ॥ ॥ टीका ॥ बाणश्रीकृष्णींभेदला ॥ जराव्याधाचाहातपूर्णनिवाला ॥ म्हणेम्यांमोटामृगविंधिला ॥ म्हणोनिधांवलाध
रावया ॥ २१ ॥ देखोनिचतुर्भुजपुरुषासी ॥ भयस्फुरलेंजराव्याधासी ॥ गजघडल्यामहापापराशी ॥ परमपुरुषासीविंधिलें ॥ २२ ॥ म्हणे
कटकटारेअदृष्टा ॥ आचरलेंकर्मदुष्टा ॥ ऐसियामजमहापापिष्टा ॥ दुःखदुर्घटकोणवारी ॥ २३ ॥ जगाचापरमात्माश्रीहरी ॥ तोम्यां
विंधिलाबाणवरी ॥ मास्यापापासमानथोरी ॥ नाहींसंसारींआनासी ॥ २४ ॥ भयेंस्फुरलाथोरकंप ॥ मजघडलेंहेंमहापाप ॥ जगाचेंजें
ध्येयस्वरूप ॥ त्यासिसंतापम्यांदिधला ॥ २५ ॥ ज्याचेअमरवंदितीचरण ॥ ज्यासिसंतयेतीलोटांगण ॥ त्याकृष्णासिविंधिलाबा
ण ॥ पापसंपूर्णमजघडलें ॥ २६ ॥ अवचटेंआत्महत्याघडे ॥ तेंपापकदांनझडे ॥ जगाचाआत्माकृष्णानाडेंकोडें ॥ तेआत्महत्याम-

स्तकीं माझे ॥ २७ ॥ जगाचें आत्महनन ॥ कर्ता मी एक पापी पूर्ण ॥ त्या पापाचें पुरश्चरण ॥ सर्वथा जाण दिसेना ॥ २८ ॥ प्रसादें ब्रह्महत्या घडे ॥ तेणें पा
पें तो समूळ बुडे ॥ तें पूर्णब्रह्म म्यां पुढें ॥ बाणें सदृढें विंधिलें ॥ २९ ॥ कर्मपापी मी व्याधरूप ॥ तेणें जोडलें पाप अमूप ॥ कृष्ण परमात्मा चित्स्वरूप ॥ त्यासि
ही संताप दिधला म्यां ॥ ३० ॥ येणें अनुतापें तनपूर्ण ॥ धांवोनि घालीं लोटांगण ॥ श्रीकृष्णाचे श्रीचरण ॥ मस्तकीं जाण दृढ धरिले ॥ ३१ ॥ मर्दी देह्या
चा अभिमान ॥ मधु हे श्याम मधुसूदन ॥ त्याचे दृढ धरूनि चरण ॥ करी रुदन अट्टाहासें ॥ ३२ ॥ चरणीं घातली परम मिठी ॥ उठविना कदा नुठी ॥ मज
क्षमा करी कृपादृष्टी ॥ कृपाळू सृष्टी तूं एक ॥ ३३ ॥ ॥ श्लोक ॥ अजानता कृतमिदं पापेन मधुसूदन ॥ क्षंतुमर्हसि पापस्य उत्तमश्लोक मेऽन
घ ॥ ३५ ॥ ॥ टीका ॥ अति भीत जरा व्याध ॥ म्हणे मी पापात्मा अति अशुद्ध ॥ नेणतां घडला हा अपराध ॥ लिंगभेद मज घडला ॥ ३४ ॥ जो ईश्वर
प्रतिमा उच्छेदी ॥ तो महापापी लिंगभेदी ॥ त्या नुज ईश्वरासि म्यां दुर्बुद्धी ॥ अदृष्टविधी विंधिलें ॥ ३५ ॥ ऐसा मी पापी पापकर्मी ॥ महापापी जो पापा
त्मा ॥ माझा अपराध करावा क्षमा ॥ पुरुषोत्तमा कृपाळुवा ॥ ३६ ॥ नृकृपाळू त्रिजगतीं ॥ गर्भीं राखिला परीक्षिती ॥ गजेंद्राचे अति आकांतीं ॥ उद्री
कृपामूर्ती धांवली ॥ ३७ ॥ पांडव जळतां जोहरी ॥ तुवां काढिले विवरद्वारीं ॥ शरत्वीं अर्जुनाचा केवारी ॥ घोर झुंजारी भीष्मारी ॥ ३८ ॥ द्रौपदीचे अ
निसांकटीं ॥ धांवलासी लवडसवडी ॥ तिळभरी न दिसतां उघडी ॥ नेसतां लुगडीं तूं हारी ॥ ३९ ॥ ऐशी कृपाळुत्वाची ख्याती ॥ श्रुती पुराणें वाखा
णिती ॥ तुम्हां उत्तमश्लोक म्हणती ॥ कीर्ति वर्णिती महासिद्ध ॥ ४० ॥ नेणतां विचरलों दुष्कर्मा ॥ तें मज करावया क्षमा ॥ नृकृपाळू परमात्मा ॥ पुरुषोत्तमा क्षमा
शीळ ॥ ४१ ॥ अजामेळ दुराचारी ॥ पुत्र लोभें नाम उच्चारी ॥ त्याचे पापाची झाली बोहरी ॥ ऐशी निष्पाप थोरी नामाची ॥ ४२ ॥ नामें निष्पाप दुर्गती ॥ नामें नि
ष्पाप पितृघाती ॥ नामें दुराचारी तरती ॥ हे निष्पाप ख्याती नामाची ॥ ४३ ॥ ॥ श्लोक ॥ यस्यानुस्मरणं नृणामज्ञानध्वांतनाशनं ॥ वदंति तस्य ते वि
ष्णो मया साधु कृतं प्रभो ॥ ३६ ॥ ॥ टीका ॥ ज्या विष्णूचें नामस्मरण ॥ कोटी जन्माचें अज्ञानघन ॥ जगाचें निर्दळी निपूर्ण ॥ सकळ कल्याणदायक
॥ ४४ ॥ ऐसें ज्याचें नामस्मरण ॥ त्याचें तें [illegible] म्यां जाण ॥ निजघातें विंधिला बाण ॥ अपराध पूर्ण हा माझा ॥ ४५ ॥ ज्याचें अगाध महिमा

न॥ सदां वर्णिती साधूसज्जन॥ जो सर्वरूपें सच्चिद्घन॥ स्वामी श्रीकृष्ण जगाचा॥४६॥ जगाचें जीवन श्रीकृष्ण॥ त्या कृष्णा सहित मी आपण॥
विंधिला निर्वाणीचा बाण॥ हा अपराध पूर्णपें माझा॥४७॥ त्रैलोक्य राजा कृष्ण समर्थ॥ तो म्यां केला राजघात॥ जगाचा आत्मा श्रीकृष्ण
नाथ॥ तो आत्मघात म्यां केला॥४८॥ श्रीकृष्ण जगाचा जनिता॥ त्याशीं केला पितृघाता॥ जगप्रतिपालक श्रीकृष्णमाता॥ त्या मातृघात
म्यां केलें॥४९॥ श्रीकृष्ण ब्राह्मण ब्राह्मणबोध॥ तो म्यां केला ब्रह्मवध॥ या हि नि अगाध॥ जगीं अपराध असेना॥५०॥ राजघात आत्म
घात॥ मातृपितृब्रह्मघात॥ मज चि घडला समस्त॥ जे म्यां श्रीकृष्णनाथ विंधिला॥५१॥ ॥श्लोक॥ त्वमाशु जहि वैकुंठ पाप्मानं मृगलुब्ध
कं॥ यथा पुनरहं त्वेवं न कुर्यां सदतिक्रमं॥३७॥ ॥टीका॥ ऐशिया मज पापकारी॥ कृपाकरा वाल्हे पिकेशी॥ निष्कृती होय या पापासी
त्या उपायासी करावें गीं॥५२॥ कोरडिये कूपेंचा संबंध॥ तेणें न फिटे दोष बाध॥ माझा जें हात तूं कर शिरछेद॥ तेव्हां मी शुद्ध होईन॥५३॥ मी लु
ब्धक पापबुद्धी॥ मृगलोभें पशुपारधी॥ त्या मज तूं निज हस्तें वधीं॥ तें मी त्रिशुद्ध उद्धरलों॥५४॥ जेणें देहें केलें पापकर्मा॥ तो देह निवटी पु
रुषोत्तमा॥ पुढती ऐशिया असत्कर्मा॥ न करीं अधमा नेसंकरीं॥५५॥ बाण विंधिला तुझिया पायां॥ हें अगाध पाप केलें काया॥ ते सिसिघ्र
धावें यदुराया॥ तें महापापा या निस्तारु॥५६॥ जेणें देहें केलें पापाचरण॥ त्याचें प्रायश्चित्त हें चि पूर्ण॥ करीं निज हस्तें देहदंडण॥ ह्मणो-
नि चरण दृढ धरिले॥५७॥ देहें केलें पापाचरण॥ देहलोभी तो पापी पूर्ण॥ स्थूळलिंग आणि कारण॥ याचें करीं छेदन निज चक्रें॥५८॥
श्लोक॥ यस्यात्मयोगरचितं न विदुर्विरिंचो रुद्रादयोऽस्य तनयाः पतयो गिरां ये॥ त्वन्मायया पिहितदृष्टय एतदंजः किं तस्य ते वयमस
द्गतयो गृणीमः॥३८॥ ॥ देहसंभवाचें मूळ जाण॥ स्थूळ सूक्ष्म आणि कारण॥ यांसि नातळतां तूं श्रीकृष्ण॥ चतुर्भुज संपूर्ण दे
ह धरिसी॥५९॥ स्थूळ सूक्ष्म कारणा॥ ये तिन्ही त्रिगुणांसि नातळतां॥ तूं योगमायेचा सत्ता॥ नाना अवतार ता देह धरिसी॥६०॥ नव
ल तुझा लीला विग्रहो॥ मत्स्य कूर्म रे नवराहो॥ हो तां न धरिसी संदेहो॥ जन्म मरो तुज नाहीं॥६१॥ बोढवल्या जन्म एक॥ ब्रह्मादि होते र

क ॥ तोतूं अवतार अनेक ॥ धरिसी निःशंक निजात्मता ॥ अदृष्टाचियें निजगती ॥ देहासि नाना भोगगती ॥ तूं अदृष्टवीण श्रीपती ॥ ना
नाभोगसंपत्ती भोगिसी ॥ ६३ ॥ आयुष्यतंव देहधारण ॥ वेदें नेमस्त केलें जाण ॥ नवल तुझें लीलाविंदाण ॥ आयुष्येंवीण देह धरिसी ॥
६४ ॥ काळसत्ता दुर्धर पूर्ण ॥ ब्रह्मादिकां अलोट मरण ॥ तुज काळ वेळ न सतां जाण ॥ स्वलीला मरण दाविसी ॥ ६५ ॥ तुझे योगमा
येची योगगती ॥ लीलाविग्रहें देहस्थिती ॥ अतर्क्य सर्वांसी सर्वार्थी ॥ नेहि उपपत्ती निर्धारीं ॥ ६६ ॥ ब्रह्मा जगाचा आदिकर्ता ॥
त्यासही न कळे तुझी सत्ता ॥ तूं नाना अवतारीं देहधर्त्ता ॥ तयाचा कर्ता न दे ब्रह्मा ॥ तूं स्वलीला देह कैसा धरिसी ॥ अवतारचरि
त्रें कैसीं करिसी ॥ कैसेनि देह सांडिसी ॥ हें ब्रह्मादिकांसी कळेना ॥ ६८ ॥ त्यासी तूं सानिसी अतिसन्मानी ॥ सदाशिव जो त्रिकाळज्ञा
नी ॥ त्यासिही तुझी अतर्क्य करणी ॥ शार्ङ्गपाणी श्रीकृष्णा ॥ ६९ ॥ सदाशिवाचें निजवचनीं ॥ तुं दुर्जनें झालासि मोहनी ॥ तें शिवा
सि न कळे करणी ॥ न तक्षी मूळला ॥ ७० ॥ जाणोनि योगज्ञान दोनी ॥ सनकादिक ब्रह्मज्ञानी ॥ जिहीं माया पटळ छेदुनी ॥ स्वानंदभव
नी सुखस्वरूप ॥ ७१ ॥ त्यासिही तुझी स्वलीलाशक्ती ॥ सर्वथा न कळे चिर्भ्रापर्ती ॥ जयविजयां शापदेतें ॥ सकोप स्थिति वैकुंठीं ॥
७२ ॥ पारंगत वेदशास्त्रार्थी ॥ बृहस्पत्यादि वाचस्पती ॥ त्यांसिही लीलाविग्रहस्थिती ॥ नवळे निश्चित श्रीकृष्णा ॥ ७३ ॥ सज्ञा
न ज्ञाते जे परमार्थी ॥ त्यांसिही तुझी अवतारशक्ती ॥ न कळे मा देवांसि ते स्थिती ॥ कैशा रिती कळेल ॥ ७४ ॥ इंद्रादि देवादि विभाग निष्ठ ॥
मायाआच्छादित यांच्या दृष्टी ॥ त्यांसि तुझी लीलेची गोष्टी ॥ न कळे जग जेवीं निश्चित ॥ ७५ ॥ तेथ मायाविंद्रव वंना ॥ मूढां धन के सर्वथा
तुझी लीला श्रीकृष्णनाथा ॥ अतर्क्य सर्वथा सर्वांसी ॥ ७६ ॥ एकसें झाली ब्रह्मज्ञान ॥ परि तुझें स्वलीला देहधारण ॥ याचें नेणती पर्या
वसान ॥ अतिसज्ञान साकल्यें ॥ ७७ ॥ तेथें मी तव अधमजन ॥ मराठी तें भाजन ॥ त्या मज तुझें लीलावर्णन ॥ सर्वथा जाण अतर्क्य ॥
७८ ॥ आतां असो हें निरूपण ॥ बहु बोलावें कायकारण ॥ माझ्या पापाचें पुरश्चरण ॥ देहदंडण करी कृष्णा ॥ ७९ ॥ तुझें निजस्वें देहदं

॥ तेणें सकळपापानिर्दळण ॥ मज उद्धरावयाजाण ॥ हें कृपापूर्णकरावी ॥ ८० ॥ ह्मणोनी घातलें लोटांगण ॥ धांवोनि धरिले दोनी चरण ॥ ऐको
नियाधावेंस्तवन ॥ कृपा श्रीकृष्णातुष्टला ॥ ८१ ॥ ॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ मा वोर्जं रत्नमुक्तिष्ठकाम एष कृतो हि मे ॥ पाहि त्वमद्नुज्ञातः -
स्वर्गंसत्कानिनां पदं ॥ ३ ॥ ॥ टीका ॥ जो वेदार्थाचा मथितबोध ॥ जो जगदादि आनंदकंद ॥ जो स्वरूपें स्वानंद स्फुरद्रूप ॥ तो व्याधेंसि गोविंद
सकृपबोले ॥ ८२ ॥ तूं जीवघातक पारधी ॥ भय मानिसी मम अपराधी ॥ तुज अभयगा त्रिशुद्धी ॥ माझी कार्यसिद्धी त्वां केली ॥ ८३ ॥ कुमरीं सां
कळेला रुद्ररूप ॥ कपटें ब्राह्मणा आला कोप ॥ कुळासि झाला ब्रह्मशाप ॥ हा त्रिविधसंकल्प माझाचि ॥ ८४ ॥ शापावशेष लोह जाण ॥ त्याचा
तुवां केला निर्बाण ॥ मृगलामें विंधिला चरण ॥ त्यासही कारण शाप माझा ॥ ८५ ॥ मी बुद्धीची अनादि बुद्धी ॥ मी क्रियेची क्रियत्रिशुद्धी ॥
तेथें अहंकर्तृत्वाचे विधी ॥ तूं वृथा अपराधी ह्मणविसी ॥ ८६ ॥ मिथ्या धरूनि देहाभिमान ॥ ह्मणसी घडलें पाप पूर्ण ॥ त्याहि पापासी पुर
श्चरण ॥ माझें दर्शन मुख्यत्वें ॥ ८७ ॥ माझिया नामा एका साठीं ॥ जळती महापातकें कोटी ॥ त्या मज देखिलें दृष्टी ॥ परमभाग्यें भेटी घड
ली तुज ॥ ८८ ॥ माझी व्हावया क्षणार्ध भेटी ॥ एक रिगाले कपाटीं ॥ एक योगयागसंकटीं ॥ झाले महाहटीने भस्त ॥ ८९ ॥ एवं नानानेम
आटाटी ॥ शिणतां हि संकल्पकोटी ॥ स्वप्नीं न लभे माझी भेटी ॥ त्या मज त्वां दृष्टी देखिलें ॥ ९० ॥ माझें होतां चि दर्शन ॥ सकळपातकां नि
र्दळण ॥ तूं पुण्यात्मा परिपूर्ण ॥ पापाभिमान धरूं नको ॥ ९१ ॥ तूं ऐसें मानिसी आपण ॥ परब्रह्म परमात्मा श्रीकृष्ण ॥ त्यासी विंधिला निर्वाण
बाण ॥ हें पाप दारुण अनिवार ॥ ९२ ॥ लोहा परिसा आलिंगन ॥ तेणें लोहा होय सुवर्ण ॥ त्यासी फोडूं आल्या लोहघण ॥ अघातें सुव
र्णता होय ॥ ९३ ॥ तेवि भक्तीं घेतल्या माझी भेटी ॥ पातकें जाती उठाउठी ॥ कांहीं वैर देखिल्या मज दृष्टी ॥ पातकां तुटीं न लागे काळ ॥ ९४ ॥ हो-
कां इतरांच्या अपराधता ॥ प्राणी पावे अधःपाता ॥ तो निजअपराध ममागता ॥ नित्यमुक्तता अपराध्यां ॥ ९५ ॥ तो मम अपराधें नरक पा
वे ॥ तें माझें सामर्थ्य बुडालें आघवें ॥ माझेनि अपराधें सुख पावे ॥ मुक्त वैमनस्यें निर्मुक्त ॥ ९६ ॥ विष ह्मणोनि अमृतपान ॥ केल्या अमरत्व

नत्तुकेजाण॥तेंविद्वेषेंहिमाझेंदर्शन॥करीपावनप्राण्यासी॥१७॥जाणोनिअग्निलाविलाघरीं॥तोजाळूनिसर्वहीभस्मकरी॥तेणना
गेविलावळवणीवरी॥तोहीकरीतेसेंची॥१८॥तेंविंभावेंअथवाद्वेषेंपूर्ण॥ज्यासीघडेमाझेंदर्शन॥तोहोयपरमपावन॥हेंसत्यजाण
जराव्याधा॥१९॥मजठाकावयानिजधाम॥तांसिद्धकेलेंमाझेंकाम॥तेणेंतुष्टलोंमीआत्माराम॥तूंपावनपरमतिहींलोकीं॥२०॥
ज्यानावम्हणसीपापपर्ण॥जेणेंदेहेंमजविंधिलाबाण॥तेणेंदेहेंतूंआपण॥होसीस्वर्गभूषणसुरवंद्य॥१॥यागकरूनियाज्ञिक॥पा
वतीसुखपक्वनात्मक॥तैसेंतुजनघडेदेख॥तूंअक्षयसुखपावसी॥२॥माझियादर्शनाचेंपुण्य॥दिव्यभोगेंनव्हेक्षीण॥यालागींअक्षय
सुखसंपूर्ण॥तूंसर्वथाजाणपावशी॥३॥तूंविकल्पसांडोनियांपोटीं॥जराव्याधासवेगउठीं॥मिथ्यानव्हतीमाझ्यागोष्टी॥तूंअक्षयतु
ष्टीपावसी॥४॥तूंऐसेजीवींकल्पिसी॥आपणनिघालानिजधामासी॥मागेंम्याअक्षयसुखासी॥कोणापासींमागावें॥५॥ऐसेंबोल
तीइतरलोक॥ममाज्ञातेंसीनव्हेदेख॥गाकठोकआतांचरोख॥अक्षयसुखपावसी॥६॥माझेआज्ञेनेंलाहोनिबळ॥धनअद्यापीझाल
अढळ॥मांझीआज्ञावंदीकाळ॥कोणआटाळकरूंशके॥७॥ऐसेंश्रीमुरेंआपण॥जंवबोलोंनशकेश्रीकृष्ण॥तंवघवघवीतविमान॥व्याधा
सिजाणउतरलें॥८॥ ॥श्लोक॥इत्यादिष्टोभगवताकृष्णेनेच्छाशरीरिणा॥त्रिःपरिक्रम्यतंनत्वाविमानेनदिवंययौ॥४०॥ ॥टीका
जोपूजिंजेसुरासुरीं॥जोपरमात्माचराचरीं॥जोलीलाविग्रहदेहधारी॥जोयोगेश्वरींवंदिजे॥९॥ऐसाअविनाशश्रीकृष्ण॥तेणेंज
राव्याधआज्ञापुन॥कृष्णाइच्छामात्रेंविमान॥देदीप्यमानजेंआलें॥१०॥व्याधेंदेखोनिविमाना॥हर्षेंनिर्भरझालामना॥तीनप्रदक्षिणा
करूनिकृष्णा॥नमूनिविमानाआरूढे॥११॥व्याधआरूढोनिविमाना॥नमूनिद्वंद्वंद्वग्रहणा॥अक्षयींसुरवस्वर्गभुवना॥कृष्णाकृपे
जाणापावला॥१२॥जेणेंअपकारकेलापूर्ण॥त्यासिउपकारकरावाआपण॥हेंनिजशांतज्ञान॥स्वांगेंश्रीकृष्णास्वयेंदावी॥१३॥
ब्रह्मज्ञानाचेंबोलबोलती॥तेसेंनाहींकृष्णनाथी॥आंगेंदाऊनियांस्थिती॥व्याधनिश्चिनोउद्धरिला॥१४॥सकळकुळाचेंनिर्द-

कण॥ऐसास्वामीमोहनधरीश्रीकृष्ण॥जेणेंनिजांगींविंधिलाबाण॥तोव्याधहीजाणसरतेंकेला॥१५॥ समुद्रतीरींयेउनीरथ॥दारुकउभाहोतातेथ॥
तेणेंनदेखतांश्रीकृष्णनाथ॥गवेषणार्थनिघाला॥१६॥ ॥श्लोक॥दारुकःकृष्णपदवीमन्विच्छन्नधिगम्यतां॥वायुंतुलसिकामोदमाघ्राया
भिमुखंययौ॥४१॥ ॥टीका॥कृष्णनदेखतांदारुक॥कासावीसझालादेख॥शोधीतश्रीकृष्णपदांक॥पृथ्वीसम्यकअवलोकी॥१७॥
तंवकृष्णकंठींच्यातुळसीमाळा॥त्याचाआमोददारुकाआला॥तेणेंगंधाभिमुखनिघाला॥तंवदेखताझालामहातेज॥१८॥ ॥श्लोक॥तं
तत्रतिग्मद्युभिरायुधैर्वृतंह्यश्वत्थमूलेकृतकेतनंपतिं॥स्नेहप्लुतात्मानिपपातपादयोरथादवप्लुत्यसबाष्पलोचनः॥४२॥ ॥टीका॥तंवथ
गधगीततेजाळा॥दिव्यआयुधांचामेळा॥त्यामाजीघनसांवळा॥श्रीकृष्णडोळांदेखिला॥१९॥अश्वत्थातळींधरूनिस्थान॥घालूनि
यांवीरासन॥निजतेजेंविराजमान॥दारुकेंश्रीकृष्णदेखिलासखें॥२०॥कृष्णदेखतांउवडसवडी॥रथासालींघालूनिउडी॥पोटिंच्या
संभ्रमआवडी॥धरिलेतानंदींहरिचरण॥२१॥नेत्रींअश्रूनियाधारा॥आंगकांपतथरथरा॥तुजवेगळेंशार्ङ्गधरा॥अंधतमनेत्रदद
दे॥२२॥ ॥श्लोक॥अपश्यतस्त्वच्चरणांबुजंप्रभोदृष्टिःप्रनष्टातमसिप्रविष्टा॥दिशोनजानेनलभेचशांतिंयथानिशायामुडुपेप्रनष्टे॥
४३॥ ॥टीका॥ऐकस्वामीश्रीकृष्णा॥नदेखतांतुझियाश्रीचरणा॥जगदांध्यपडेनयना॥दिशांचीगणणागणीकोण॥२३॥ज्ञानेंसि
मावळलाविवेक॥अणुमात्रनलगेसरिस॥तुजनदेखतांमीदेख॥जडमूढमूर्खहोऊनिठेलों॥२४॥जेविंनष्टचंद्राचियेरात्री॥निबी
डअंवसेचियेआंधारी॥तेविंतुजवीणश्रीहरी॥इददाटेसंसारींअंधतमपेंगा॥२५॥तुझेदेखतांश्रीचरण॥अंधतमानिर्दळण
॥जेविंप्रगटतांरविकिरण॥आंधारेंसीजाणनिशानासे॥२६॥ ॥श्लोक॥इतिब्रुवतिसूतेवैरथोगरुडलांछनः॥खमुत्पपातराजें
द्रसाश्वध्वजउदीक्षतः॥४५॥ ॥टीका॥ऐसेंविनवीजंवदारुक॥तंवपरमाश्चर्यकांहीएक॥देखताझालाअलौकिक॥पाहेंवीण
देखउडालारथु॥२७॥चहूंवारुवांसंयुक्त॥गरुडध्वजेंसीकृष्णरथ॥ऊर्ध्वगतीगगनाआंत॥दारुकादेखउतरला॥२८॥शुकाचें

भा· परिक्षिती॥निजधामाजातांश्रीपती॥आपुलीऐश्वर्यसंपत्ती॥स्वेछाऊर्ध्वगतीस्वयेंनेत॥२९॥इहलोकींठेउनीकीर्ती॥निजवैभवविला-
१ ससंपत्ती॥आवरूनियांनिजशक्ती॥स्वयेंऊर्ध्वगतीस्वसत्तानेत॥३०॥ ॥श्लोक॥तमन्वगच्छन्दिव्यानिविष्णुप्रहरणानिच॥तेनाति-
विस्मितात्मानंसूतमाहजनार्दनः॥४५॥ ॥रथजातांऊर्ध्वमंडळ॥शंखचक्रगदाकमळ॥तदनुलक्ष्मीततकाळ॥दिव्यायुधेंसकळनि
घालीं॥३१॥ऊर्ध्वमंडळींउडालारथ॥दिव्यायुधेंहिसमस्त॥तेंदेखोनिअतिविस्मित॥ठेलातटस्थदारुक॥३२॥धुरेवैसोनियांनित्य॥मी
वागवींश्रीकृष्णरथ॥तोरथऊर्ध्वगतीकृष्णनेत॥मजकांयेथसांडिलें॥३३॥मजसांडुनियांगोविंदें॥नेलीआपुलींदिव्यायुधें॥मीअ-
भाग्यभाग्यमदें॥त्यजिलांमुकुंदेंनिश्चित॥३४॥म्याउडीघातलीरथाखालती॥हेचीमाझीमंदमती॥येरवींमीहीजातोंऊर्ध्वगती॥कांश्री
पतीरूसला॥३५॥जेणेंविंधिलाबाण॥तोव्याधहिउद्धरिलाजाण॥मीभाग्येंअभाग्यपूर्ण॥यालागींश्रीकृष्णमजत्यागी॥३६॥नि
सकृष्णरथींपडे॥धुरेवैसोनिवागवीघोडे॥तोमीकृष्णावेगळापडे॥भाग्यकुडेंपैंमाझें॥३७॥मीश्रीकृष्णाचासारथी॥ऐशीत्रिलोकीं
झालीख्याती॥तोमीवेगळापडेंअंतीं॥कांश्रीपतीरुसलासी॥३८॥याकल्पजन्मभोगिलेंकृष्णासख॥त्यामजवोडवलेंवियोगदुःख॥कृ-
ष्णाकांझालासीविन्मुख॥मीदीनरंकपैंतुझें॥३९॥माझाबोलअणुभरी॥नाहींअव्हेरिलाहरी॥त्यामजआतांतूंश्रीहरी॥अतिदुर्धरी
दुराविशीकां॥४०॥अपराधीतारिलेंम्याधासी॥अश्वध्वजेंसिरथनेसी॥तोतूंमजउद्धरावयासी॥कांउबगलासीगोविंदा॥४१॥ऐसा-
अवस्थाभूतपूर्ण॥पाहातांश्रीकृष्णाचेंवदन॥दारुकासीआलेंरुदन॥आसुवींनयनलोटले॥४२॥दीर्घस्वरेंदेउनिहांक॥दारुकरडे
अधोमुख॥अंतींश्रीकृष्णझालाविन्मुख॥हेंअतिदुःखमजमाझें॥४३॥दुःखेंचरफडीतमोटा॥करेंपीटीतललाटा॥मरमरवि
धातयानष्टा॥वोखटेंअदृष्टाकांलिहिलें॥४४॥मगम्हणेश्रीकृष्णनाथा॥तुजपुढेंबापुडाविधाता॥तुजवेगळामीराहातां॥
अतिदीनतापावेन॥४५॥तुझेनिवळेंश्रीकृष्णा॥म्याकळिकाळाघातलाआंकणा॥तोमीकाळाचावोळगणा॥कांकरिसीपै

सकळजगाचा ॥ ४६ ॥ ऐसें ऐकोनि येथंवचन ॥ नाभी म्हणे जनार्दन ॥ मग अश्वासून पूर्ण ॥ गुह्य आलोचन सांगत ॥ ४७ ॥ आजि च्या काळाचे
काळगती ॥ तूं एक उरलासी निकटवर्ती ॥ तुज म्या राखिलें कार्यार्थी ॥ वेगें द्वारावतीं तूं जाईं ॥ ४८ ॥ ॥ श्लोक ॥ द्वारकायां च नस्तेयं भ
वद्भिः स्वस्वबंधुभिः ॥ मयात्यक्तां यदुपुरीं समुद्रः प्लावयिष्यति ॥ ४७ ॥ स्वं स्वं परिग्रहं सर्वे आदाय पितरौ च नः ॥ अर्जुनेनाविताः सर्व इंद्रप्रस्थं
गमिष्यथ ॥ ४८ ॥ ॥ टीका ॥ तुवां जाऊनि यांत्यापाशीं ॥ शीघ्र सांगावें समस्तांसी ॥ कोणी न राहावें द्वारकेसी ॥ निघावें वेगेंसी ममाज्ञा
॥ ४९ ॥ द्वारका त्यागावया चें कारण ॥ तुज मी सांगेन आपण ॥ दारुका तूं अतिसज्ञान ॥ विश्वासपूर्ण मज तुझा ॥ ५० ॥ यालागीं तुज राहा
ऊनि येथें ॥ अंतकाळाचें गुज सांगत ॥ तुवां जाऊनि द्वारकेंत ॥ बाहेर समस्त काढावे ॥ २५१ ॥ बाहेर काढावया चें कारण ॥ म्या द्वारका
त्यागिया जाण ॥ समुद्र येऊनि आपण ॥ नगर संपूर्ण बुडवील ॥ ५२ ॥ ठाव मागूनि समुद्रापाशीं ॥ म्या वसविलें द्वारकेसी ॥ मज गेलि
या निजधामासी ॥ तो अवघ तेसी बुडवील ॥ ५३ ॥ यालागीं सत्वर गमन ॥ शीघ्र करावें आपण ॥ माझी मातापिता समस्त जन ॥ द्वारके
हून काढावे ॥ ५४ ॥ जंव समुद्र बुडवि ना तो ठाव ॥ तंव रीघ आपुल्या समुदावो ॥ घेऊनि सकळ परिग्रहो ॥ शीघ्र नरपाहा हो निघावें
॥ ५५ ॥ झालिया राज्यलोट ॥ चोर कुळीत होईल वाट ॥ कोणी न वचावें एकवट ॥ अवघी एकवाट करावी ॥ ५६ ॥ अर्जुनाचे निसांगा
तें ॥ एकत्र मिळूनि समस्तें ॥ शीघ्र जावें इंद्रप्रस्थातें ॥ तो मार्गी त्यातें रक्षील ॥ ५७ ॥ ऐसें ऐकतां कृष्णा वचन ॥ दारुकासी आलें
रुदन ॥ वचनें सांडूं पाहे प्राण ॥ जळेंवीण मीन जैसा ॥ ५८ ॥ निजकुळासी करूनि घात ॥ गेला गेला रे श्रीकृष्णनाथ ॥ मी काळमुखा
द्वारके आंत ॥ जावों हा वृत्तांत सांगावया ॥ ५९ ॥ मिळूनि श्रीकृष्णा निजसखा ॥ म्हणती हा आला काळमुखा ॥ सकळ जगाचिया
दुःखा ॥ सूचक देखा मी होईन ॥ ६० ॥ ऐकतां माझिया वचनासी ॥ प्राणांत होईल सर्वांसी ॥ येवढें घावया महादुःखासी ॥ न
वचे हर्ष कशी मतियें ॥ २६१ ॥ ज्यासी म्या सांगावी हे वार्ता ॥ त्याच्या करावें जा वघाता ॥ येवढी घोर निष्ठुरता ॥ न व्हे कृष्णना

थामाझेनी॥६३॥ बहुतांपुण्याचाविवरासी॥जैविआगिलावावीहृषीकेशी॥तेविंहेवार्ताद्वारकेसी॥म्यासुहृदापाशींसांगावी॥६४॥ अ
जैविंफळतेंफुलतेवनी॥भडेनिलावावादावाग्नी॥तेंसाभडकाद्यासुहृदांचेकानी॥कृष्णानिधनाग्नीकोणलावी॥६५॥जैविंपुजन ३०
याचेमाथां॥पाषाणनदेववेसर्वथा॥तेविंकृष्णासहीतकुळाच्याघाता॥मीनव्हेसांगतासुहृदांसी॥६५॥सुखव्यावेंसुहृदांसी॥
तेंराहिलेंहृषीकेशी॥घेऊनियांमहादुःखाचियाराशी॥सुहृदापाशींमीनवचे॥६६॥ ।आशंका॥म्हणसीजन्मवरीअवज्ञा॥तु
वांनाहींकेलीअतिमज्ञा॥तोतूंअंतकाळींच्यावचना॥कांअवज्ञाकरितोसी॥६७॥कृष्णाअंतकाळींचेश्रीमुख॥पाहातांमजअ
त्यंतसुख॥नेंसाडूनिजनासिदुःख॥धावयादेखमीनवचें॥६८॥कुळनिधनाचेंघोरदुःख॥कृष्णनिधनसंतापक॥माझेंवच
नमात्रेंचेंविख॥जगासिदेखनदेववेमज॥६९॥तुझेआज्ञेकरितांदेख॥जगासियावेंमहादुःख॥तुझेअवज्ञेचाउल्लेख॥नरकदाय
कमजहोय॥७०॥माझापणाचिघेऊनिविख॥तुजपुढेंमरतांदेख॥उत्तमगतीअलौलिक॥मीनिजनिष्टंकपावेन॥७१॥ऐसेंम्हणोनिअ
पण॥दारुकेंघांतलेंलोटांगण॥मस्तकींधरिलेश्रीचरण॥सर्वथाजाणसोडीना॥७२॥देखोनिदारुकाचाभावो॥कृपेद्रवलादेवाधि
देवो॥जेणेंनिर्दळेशोकमोहो॥तेंवर्मपाहाहोसांगत॥७३॥ श्लो॰ त्वंतुमद्धर्ममास्थायज्ञाननिष्टउपेक्षक॥मन्मायारचनामेतांविज्ञायोप
शमंव्रज॥४॥ टी॰ माझाधर्माचेंनिजलक्षण॥हृदआश्रइतांआपण॥पावोनिमाझेंज्ञानविज्ञान॥तूंब्रह्मसंपन्नस्वयेंहोसी॥माझेधर्मा
चेनिजलक्षण॥तूंह्मणसीकोणकोण॥ऐकदारुकासावधान॥मद्धर्मपूर्णतेऐसे॥७५॥हृदयींनित्यमाझेंध्यान॥मुखींमाझेंनामकीर्तन॥
श्रवणींमाझीकथाश्रवण॥करीमद्र्चनसर्वदा॥७६॥नयनीममपूर्तिदर्शन॥चरणींमदालयांगमन॥रसनेममतीर्थप्राशन॥महाप्रसा
दभोजनअत्यादरें॥साष्टांगेंमजाचिनमन॥अल्हादेंमद्भक्तांआलिंगन॥सप्रेमसमाझेसेनेवीणा॥रिताअर्धक्षणजाऊंनेदी॥७८॥ऐसीसेवाकरि १२
तांपाहाहो॥सर्वभूतीदेखेसद्भावो॥हासर्वधर्मामाजीरावो॥तेथेंअपावोकदांनरिघे॥२७९॥सर्वभूतांमाझेंदर्शन॥ नेव्हांवैरा

ष्यवोसंदेसंपूर्ण ॥ तैथसहजेंउवेशुद्धज्ञान ॥ देहाभिमानठेळक ॥ ८० ॥ देहाभिमानहोतांक्षीण ॥ अपेक्षेसिपडेशून्य ॥ तेव्हांनिरपेक्षतापूर्ण
सहजेंजाणठमावे ॥ ८१ ॥ निरपेक्षतेच्चीदशाकैशी ॥ विषयभेदन्द्रियाइंद्रियांसी ॥ उपेक्षाकरीत्यांसी ॥ जेविंमृगजळासीसज्ञान ॥ ८२ ॥
याद्दष्टीपाह्यतांचराचर ॥ समूळमिथ्याव्यवहार ॥ जेविंदोराचासर्पाकार ॥ तेविंभ्रमेंसंसारभासत ॥ ८३ ॥ केवळदोराचासर्पाकार ॥
तोश्वेतकृष्णवर्कांरक्तांबर ॥ तेविंविषयींविषयव्यवहार ॥ मिथ्यासंसारमाइक ॥ ८४ ॥ जेविंशुक्तिकेच्चारजताकार ॥ नघडेएकहीअ
लंकार ॥ तेविंहाआभासेसंसार ॥ मिथ्याव्यवहारमाइक ॥ ८५ ॥ मुख्यांमिथ्याभवभान ॥ त्याचेंभ्रांतासिभवबंधन ॥ तेथैंलजेंमु
क्तपण ॥ हेंहिजल्पनमायिक ॥ ८६ ॥ संसारमायीकरचना ॥ सत्यलेंवळलें त्याच्यामना ॥ तेमनविलाजेमनपणा ॥ विज्ञानजाणा
त्यानाव ॥ ८७ ॥ जागृतीसुषुप्तीआणिस्वप्न ॥ संसाराचेंमिथ्याभान ॥ त्यासिठमावल्यासंपूर्ण ॥ विज्ञानजाणत्यानाव ॥ ८८ ॥
आम्हीसज्ञानपूर्ण ॥ निर्दळूनिभवबंधन ॥ दृढसाधिलेंमुक्तपणा ॥ हेंहिजल्पनमायिक ॥ ८९ ॥ मुख्यज्ञानाचेंलक्षण ॥ साधकहोयब्रह्म
पूर्ण ॥ जगींनदेखेंमतूंपण ॥ उपशमजाणयानाव ॥ ९० ॥ ऐसाउपशमत्यासिपूर्ण ॥ त्यासीमजसींनाहींभिन्नपण ॥ दारुकेंऐकतांनि-
रूपण ॥ हृदयींतेंखुणचमत्कारली ॥ ९१ ॥ अलंकारसोनेंपाहूंगेला ॥ तंवतोचिसोनेंहोऊनिठेला ॥ तेविंमीकृष्णरसेंवोतला ॥ वि
योगनाथिलादेहलोभें ॥ ९२ ॥ मीकृष्णस्वरूपआपण ॥ मजकृष्णेंसिनाहींभिन्नपण ॥ ऐशीचमत्कारलीखुण ॥ मीब्रह्मपरिपूर्णपू
र्णावें ॥ ९३ ॥ ॥ श्लोक ॥ इत्युक्तस्तंपरिक्रम्यतनमस्कृत्यपुनःपुनः ॥ तत्पादौशीर्ष्ण्युपाधायदुर्मनाःप्रययौपुरीम् ॥ ५० ॥ ॥
टीका ॥ ऐसेंऐकोनिकृष्णवचना ॥ शिरींवंदूनिश्रीकृष्णाज्ञा ॥ खेदसांडोनियांमना ॥ कृष्णचरणालागला ॥ ९४ ॥ करूनित्रिवारप्र
दक्षिणा ॥ पुनःपुन्हांलागोनिचरणा ॥ माथांठेऊनिपदींजाणा ॥ घेऊनिकृष्णाज्ञानिघाला ॥ ९५ ॥ ब्रह्मसर्वत्रपरिपूर्ण ॥ त्याचा
बोधकश्रीकृष्ण ॥ तोनिजधामागेलाआपण ॥ तेणेंदुर्मनदारुक ॥ ९६ ॥ पुढतीश्रीकृष्णदर्शन ॥ सर्वथानलाभेआपण ॥

यात्मगीं अतिदुर्गम ॥ करी गमन द्वारकेसी ॥ ९७ ॥ दारुक धाडिला द्वारकेसी ॥ तंव मैत्रेय आला कृष्णापाशीं ॥ तेचि काळीं हृषीकेशी ॥ अज्ञ
ज्ञानासी उपदेशी ॥ ९८ ॥ तो ब्रह्मज्ञान उपदेशविधी ॥ शुक बोलिला तृतीयस्कंधीं ॥ तें निरूपण ये संधी ॥ न प्रतिपादीं पुनरुक्त ॥ ९९ ॥ पा
हावया कृष्णनिर्याण ॥ उद्धव गुप्त होता आपण ॥ तेणें ऐकोनि ज्ञाननिरूपण ॥ संतोषें नमन करी कृष्णा ॥ ५०० ॥ तेचि काळीं मैत्रेयासी ॥
स्वमुखें बोलिला हृषीकेशी ॥ विदुर येईल तुजपाशीं ॥ त्यासि तूं उपदेशीं गुह्यज्ञान ॥ १ ॥ उपदेशूनि मैत्रेयासी ॥ देवें धाडिला तो स्वाश्रमा
सी ॥ उद्धवें नमूनि हृषीकेशी ॥ तोही बदरीसी निघाला ॥ २ ॥ दारुक धाडिला द्वारकेसी ॥ मैत्रेय धाडिला स्वाश्रमासी ॥ उद्धव धाडिला ब
दरीसी ॥ व्याध धाडी स्वर्गा ॥ ३ ॥ निजरथसहित घोडे ॥ निजायुधेंसी धाडिले पुढें ॥ आतां आपण हो वाडेंकोडें ॥ निजधामा
कडे निघेल ॥ ४ ॥ निजधामा निघतां श्रीपती ॥ समस्त देव पाहों येती ॥ ते सुरस कथासंगती ॥ पुढिले अध्यायीं अतिगोड ॥ ५ ॥ अ
जन्मा तो जन्म मिरवी ॥ विदेहा आंगीं देहपदवी ॥ स्वयें अक्षयी तो मरण दावी ॥ अति लाघवी श्रीकृष्ण ॥ ६ ॥ त्याचें निजधामगमन ॥
शिवविरिंच्यादिकां अतर्क्य खूण ॥ त्याचें सांगेन उपलक्षण ॥ श्रोतां अवधान मज द्यावें ॥ ७ ॥ एकादशाचा कळस जाण ॥ श्रीकृ-
ष्णाचें निजनिर्याण ॥ जेथ नाहीं देहाभिमान ॥ तें ब्रह्म पूर्ण परिपक्व ॥ ८ ॥ भय नाहीं जन्म धरितां ॥ भय नाहीं देहीं वर्ततां ॥ भय नाहीं देह
त्यागितां ॥ हें ब्रह्मपरिपूर्णता हरी दावी ॥ ९ ॥ एका जनार्दना शरण ॥ पुढें अद्भुत निरूपण ॥ संतीं मज द्यावें अवधान ॥ सांगेन स्व
न सद्गुरुकृपा ॥ १० ॥ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंदे परमहंससंहितायां स्वकुलनिर्दलन मुशलोपाख्यान ए
काकार टीकायां त्रिंशतितमोऽध्यायः ॥ ३० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्लोक ५० ॥ ॥ ओव्यासंख्या ५१० ॥ ७

